प्रकाशक व व्यवस्थापक
रा. ज. देशमुख,
देशमुख आणि कंपनी
१९१ शनिवार, पुणें २.

संचालक
भ. व्यं. देशमुख,
बी. ए., एल्‌एल्. बी.



( २ ) मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचें आहे.
( ३ ) ब्लाक बॉंबे प्रोसेस स्टुडिओमध्यें केले आहेत.

मुद्रक
न. वि. सरदेशपांडे,
आदर्श मुद्रणालय
३९५।५ सदाशिव पेठ, पुणें २.

माझे मालवणचे स्नेही

डॉ. रा. वा. आजगांवकर

व

रा. वा. कामत

यांस

# सूर्यकमळें

वध अष्टमी

परीक्षकाची परीक्षा

धरण

विजय कोणाचा ?

कवीचें लग्न

दीपस्तंभ

कोकिळा

जहागीरदारांचा जांवई

वसुधैव कुटुंबकम्

तीन मनें

वधूपरीक्षा

देशमुख आणि कंपनीचीं



मराठीचा नाट्यसंसार

मंजिऱ्या

सुवर्णकण

—वि. स. खांडेकर

आभाळाची सांवली

—द. र. कवठेकर

देणगी

—क्षमाबाई राव

वर्धा-शिक्षण-योजना

—सं. आचार्य भागवत

आपलें आर्थिक नियोजन

—ह. रा. महाजनी

उघड्या खिडक्या

—अनंत काणेकर

दोन तपें

—ग. त्र्यं. माडखोलकर

भक्तिकुसुमें

—काका कालेलकर

नटश्रेष्ठ

—चिं. वि. जोशी

दूर्वा आणि फुलें

—प्र. के. अत्रे

विचार विहार

—कै. वा. म. जोशी

आई

—मॅक्झिम गॉर्की

नवीं प्रकाशनें



## जातां जातां—

तीन चार महिन्यांपूर्वी मी सांगलीला माझ्या आजोळीं गेलों होतों. गणपतीच्या देवळाजवळ असलेल्या माझ्या बाळपणांतल्या त्या चिरपरिचित घराजवळ मी जसजसा जाऊं लागलों, तसतसें माझें मन अनेक मधुर स्मृतींनी भरून आलें. जाईजुईच्या मूठभर फुलांनीं एखादी खोली सुगंधानें दरवळून सोडावी, त्याप्रमाणें या आठवणींनीं माझें मन आनंदित करून सोडलें होतें.

मी घरांत शिरलों. सोप्याकडे दृष्टि जातांच माझ्या डोळ्यांपुढें माझ्या आजोबांची मूर्ति उभी राहिली. लहान थोर सर्व मंडळी, सारे त्यांना बाबा-काका म्हणत असत. सोप्याच्या डाव्या बाजूला बाबाकाकांची हंसरी मूर्ति दिसली नाहीं असा त्या घरांत मी एकहि दिवस घालविला नव्हता. पहांटे अंथरुणांत या कुशीवरून त्या कुशीवर व्हावें तों पलीकडे बाबा ' अयोध्या मथुरा माया ' किंवा असाच दुसरा एखादा प्रातःस्मरणाचा श्लोक म्हणत असलेले दिसत. तिसऱ्या प्रहरीं खलबत्त्यांत विडा कुटीत ते जवळ बसलेल्या मंडळीशीं मोठ्या रसभरित गप्पा मारीत असत! आणि रात्रीं पेंगळून अंथरुणावर डोळे मिटून पडल्यावर पलीकडून बाबाकाकाच्या मधुर स्वरानें उच्चारलेले ' आस्तिक, आस्तिक ' हे शब्द कानांवर आले नाहींत, असा माझा एक दिवसहि त्या घरांत गेला नव्हता.

बाबाकाका ज्या जागीं बसत असत ती आतां एका भिंतीच्या आड गेली असली तरी माझ्या डोळ्यांना ती भिंत मध्यें नाहीं असाच भास होत होता. मात्र सोप्यावरून आंत शिरल्यावर आपण एखाद्या अपरिचित घरांत तर आलों नाहीं ना असें मला वाटूं लागलें. कालमानाप्रमाणें घराच्या आंतल्या भागांत थोडासा बदल झाला होता हें खरें. पण याच घराच्या माजघरांत माझ्या मामेबहिणींना मी सिंदबादची नि अलिबाबाची अद्भुतरम्य कथा अनेकदां सांगितली होती, याच घराच्या स्वयंपाकघरांत ताकांत कालविलेलें लाह्यांचें पीठ किती स्वादिष्ट लागतें याचा मी अनुभव घेतला होता, आणि याच घराच्या मागच्या कौलांवर चढून कवठें काढण्याचा व पूर्णपणें पिक-

लेल्या सबंध कवठांत अमृतबिंदु असतो असें ऐकल्यामुळें पिकलेलीं सबंध कवठें खाऊन अमर होण्याचा प्रयत्न मी केला होता.

ह्या साऱ्या घरगुती आठवणी मनांत घोळत असूनहि मी एखाद्या परक्या घरांत वावरत आहें ही माझ्या मनांतील जाणीव कांहीं केल्या कमी झाली नाहीं. केवळ बहिर्सृष्टींतच नव्हे, तर अंतःसृष्टींतहि काळ किती विलक्षण बदल घडवून आणीत असतो, याचा पुरेपूर प्रत्यय त्या दिवशीं मला आला.

आणि या संग्रहांतल्या गोष्टी प्रकाशकांकडे पाठविण्यापूर्वी मी जेव्हां वाचूं लागलों, तेव्हांहि ह्याच अनुभवाची पुनरावृत्ति झाली 'विजय कोणाचा ?', 'दीपस्तंभ', 'परीक्षकाची परीक्षा' इत्यादि गोष्टींच्या नुसत्या नांवांनींच माझ्या डोळयांपुढें शिरोडें उभें राहिलें. १९४० मधलें शिरोडें नव्हे; तर १९२५–३० मधलें शिरोडें. या संग्रहांतील रूपककथांशिवाय बाकीच्या सर्व गोष्टी लेखक म्हणून माझा ज्यावेळीं नुक्ताच जन्म झाला होता, त्या काळांतल्या आहेत. या गोष्टी कलेच्या अगर इतर गुणाच्या दृष्टीनें कशाहि असल्या तरी त्यांच्याशीं माझ्या शिरोड्याच्या जीवनांतल्या अनेक काव्यमय आठवणी निगडित झालेल्या आहेत. 'विजय कोणाचा' ही गोष्ट संपवून मी खोलीबाहेर आलों तेव्हां भोंवतालच्या माडांच्या राईत वादळानें मांडलेलें तांडव मला अजूनहि आठवतें. 'दीपस्तंभ' या गोष्टीचा आरंभ आरवलीच्या प्रशांत वाळवंटांत ज्या संध्याकाळीं मला सुचला ती संध्याकाळ अजूनहि मी विसरलों नाहीं.

पण—

पण १९२५–३० च्या दरम्यान केवळ हौसेनें लिहिलेल्या या गोष्टी जेव्हां मी परवां वाचूं लागलों तेव्हां आपलेपणा आणि परकेपणा यांचें एक विचित्र मिश्रण पदोपदीं माझ्या मनांत होऊं लागलें. या गोष्टी लिहिणारा खांडेकर मीच आहें असें अनेकदां मला वाटे. पण कित्येकदां माझ्या मनांत येई— या कथा लिहिणारा खांडेकर आणि आजचा खांडेकर या दोन निरनिराळ्या व्यक्ती आहेत, असें म्हणायला कांहीं हरकत नाहीं. वामन दोन होते की तीन होते आणि तुकाराम या नांवाच्या दोन भिन्न व्यक्तींनीं लिहिलेले अभंग एकाच तुकारामाच्या नांवावर लादले गेले आहेत, इत्यादि वादांच्या

आड माझ्या या अनुभवासारखीं कांहीं विचित्र सत्यें असण्याचा संभव आहे, असें इतिहाससंशोधन करण्यापर्यंत सुद्धां क्षणभर माझ्या मनाची मजल गेली!

आपले लहानपणींचे फोटो पाहून प्रौढपणीं अनेकांवर आश्चर्यचकित होण्याचा प्रसंग येतो. मला वाटतें—एका तपांत मनुष्याच्या शरिरांत जेवढा बदल होतो, त्यापेक्षांहि जास्त त्याच्या मनांत तो होत असतो. आणि वाङ्मय हें एक प्रकारचें मनाचें चित्रणच असल्यामुळें, दहा वर्षांचें अंतर असलेल्या एकाच लेखकाच्या दोन कृतींत कित्येकदां पुसट साम्यसुद्धां आढळत नाहीं. क्ष—किरणांनीं मनुष्याच्या शरिराच्या आंतल्या भागाचे फोटो घेतां येतात तसे जर मनाचे फोटो घेतां आले तर राजकारणी पुरुष आणि साहित्यिक यांच्याविषयीं वाटणाऱ्या अनेक गूढ गोष्टींचा लोकांना सहज उलगडा होईल.

१९२५–३० या काळांतलें माझें लिखाण शाळा संभाळून फावलेल्या वेळांत केवळ हौसेनें केलें आहे. एखाद्यानें केवळ स्वतःच्या मनोरंजनाकरितां गुणगुणायला लागावें नि ज्यांना तें गुणगुणणें ऐकूं जात आहे त्यांना तें आवडत आहे असें दिसताच थोड्याशा मोकळ्या आवाजानें तें गाणें म्हणायला सुरुवात करावी—अगदीं याच पद्धतीनें मी कथालेखक झालों.

अर्थात् केवळ स्वतःसाठीं गाणाऱ्याचें त्या कलेचें ज्ञान कितपत असणार? ‘नवमल्लिका’ ‘नवचंद्रिका’ व ‘सूर्यकमळें’ या संग्रहांतल्या माझ्या अनेक गोष्टींवरून लघुकथा व गोष्ट यांच्यांतल्या भेदाची त्यावेळीं मला स्पष्ट जाणीव नव्हती हें सहज दिसून येईल. जी स्थिति तंत्राची तीच भाषाशैलीची. लघुकथेंत कमींत कमी शब्दांत जास्तींत जास्त परिणाम उत्पन्न करावयाचा असल्यामुळें, तिची भाषाशैली जेवढी लवचिक तेवढीच प्रत्येक रसाला परि-पोषक अशी असली पाहिजे हें उघड आहे. पण ज्या काळांत मी या तीन संग्रहांतल्या गोष्टी लिहिल्या त्या काळांत मराठीवर गडकऱ्यांचें अधिराज्य सुरू होतें. सूर्य मावळला होता; पण त्याचा प्रकाश अद्याप रेंगाळत होता. प्रसादपूर्ण लेखनांत अग्रेसर असलेले प्रो. फडके त्या काळांत टीकात्मक लेख लिहायचा असला तरी त्याच्या नांवांत भरपूर अनुप्रास आहेत कीं नाहींत, याबद्दल किती दक्षता बाळगीत हें ‘चित्रपटांची चांडाळ चैन’ यासारख्या मथळ्यावरून सहज लक्षांत येईल. अनुप्रास, कोट्या आणि कल्पनाविलास यांचें युग होतें तें! भूपाळ आणि वसुंधरा बागेंत एकांतांत बोलूं लागलीं कीं

त्यांनीं दहा पानें बोलावें आणि त्या संभाषणांत काव्य आणि तत्त्वज्ञान यांचा अगदीं अस्थानीं वर्षाव केलेला असला तरी तें नाट्य आहे असें मानून वाचकांनीं त्याचा आनंदानें आस्वाद घ्यावा असा काळ होता तो! राजकारणाप्रमाणें वाङ्मयातहि एखाद्या व्यक्तीच्या प्रभावानें भलत्याच गोष्टीला नसतें महत्त्व येतें आणि व्यक्तिमहात्म्यानें डोळे दिपून गेल्यामुळें इतर लोक आंधळेपणानें तिचें अनुकरण करूं लागतात हेंच खरें!

माझ्या पहिल्या लिखाणावर भाषाशैलीच्या बाबतींत गडकरीयुगाची छाप आहे. तसा कथानकांवरहि त्या विशिष्ट काळांतल्या कल्पनारम्यतेचा पगडा आहे. गडकऱ्यानंतरच्या एका दशकांत मराठी ललित वाङ्मयांत कल्पनारम्यतेचा उत्कर्ष झाला असे म्हणावयाला हरकत नाहीं. रविकिरण मंडळाचें काव्य, फडक्यांच्या कादंबऱ्या आणि गुर्जरांच्या गोष्टींहून अत्यंत भिन्न अशी उदयोन्मुख लघुकथा या सर्वांत इतर गुणांत विशेष साम्य नसलें तरी कल्पनारम्यतेच्या बाबतींत हे तिन्ही वाङ्मयप्रवाह त्या प्रवाहांस अगदीं समांतर वाहत होते, हें कुणाहि चिकित्सक रसिकाला मान्य होईल.

या कल्पनारम्यतेमुळेंच 'सूर्यकमळां' तल्या गोष्टींच्या कथानकात अतिरंजनाच्या छटा आल्या आहेत. 'विजय कोणाचा?' या गोष्टींतली शेवटची घटना—दारूच्या धुंदींत स्वतःचें मूल विहिरींत टाकायला जाणें—मी स्वतः डोळ्यांनीं पाहिली आहे. त्या गोष्टींत प्रतिपादन केलेली विचारसरणी—मद्यपानाचा अतिरेक मनुष्याला पशु बनवितो, दारूमुळें मनुष्य आपल्या शरीराचा गुलाम होतो, एरवीं कितीहि सालस मनुष्य असला तरी दारू त्याला घटकाभर तरी बदमाष बनविते, शेंकडा दहापांच मनुष्यांचें मद्यपान मर्यादित प्रमाणांत राहत असलें तरी शेंकडा नव्वद माणसें मर्यादित मद्यपानानें पुढें पुढें आवश्यक कैफ येत नसल्यामुळें दारूबाज होतात आणि दारूच्या पायीं आपल्या व्यक्तित्वाची, कुटुंबाची आणि माणुसकीची राखरांगोळी करतात, म्हणून दारू ही कायद्यानेंच बंद झाली पाहिजे—अजूनहि मला चुकीची वाटत नाहीं. पण ही गोष्ट जर मी गेल्या पांच वर्षांत लिहिली असती, तर केवळ तिच्या भाषेंतच नव्हे, तर तिच्या मांडणींतसुद्धां मी अनेक बदल केले असते!

ते बदल न करतां मी माझ्या जुन्या गोष्टी जशाच्या तशा छापीत आहें याचें मुख्य कारण एका विशिष्ट मनोवृत्तीनें लिहिलेल्या कृतींत फार दीर्घ काळानें

बदललेल्या मनोवृत्तीनें फरक करणें कलेच्या दृष्टीनें हितावह नाहीं असें मला वाटतें. ' संस्करण ' या गोड नांवाखालीं डॉ. माधवराव पटवर्धनां-सारख्या थोर कलावंतानें हे प्रयोग केले आहेत याची मला जाणीव आहे. पण माधवरावांच्या विषयीं अत्यंत आदर असूनहि त्यांच्या ललितकृतींच्या कल्पनेंत एक मोठें वैगुण्य होतें असें मला वाटतें. शास्त्रीय लेखन हें संस्करणानें अधिक सुंदर व प्रभावी होतें. पण ललितकृतीला मात्र हा नियम लागू करणें इष्ट नाहीं. ज्या एका विशिष्ट भावनामय आभासांत गुंग होऊन कलाकारानें आपली कृति निर्माण केलेली असते तो आभास हुकमी नसतो. किंबहुना कलाकाराच्या व्यक्ति–विकासामुळें आपल्या पूर्वींच्या निर्मितीच्या भावनांशीं समरस होणें मुद्धां त्याला अनेकदां अशक्य होतें. एखादा चित्रकार पांच वर्षांपूर्वीं काढलेलें चित्र दुरुस्त करायला लागला तर तें चित्र सुंदर होण्यापेक्षां बिघडण्याचाच संभव अधिक असतो ! नाहीं का ?

या संग्रहांतल्या गोष्टी म्हणजे कांहीं पिकलेले आंबे नाहींत; त्या कैऱ्या आहेत. पण कैऱ्या आंबट असल्या तरी त्या मिठाला लावून आवडीनें खाणारे लोक असतातच. इतकेंच नव्हे तर कैऱ्यांचें पन्हें केलें तर प्रसंगीं त्यांतला आंबटगोडपणा नुसत्या गोडपणापेक्षां अधिक अवीट असूं शकतो. मग गेलीं पंधरा वर्षें माझ्या कथालेखनानें रसिकतेनें स्वागत करणाऱ्या वाचकांना आंबट कैऱ्यांची यापेक्षा अधिक लांब कैफियत कशाला द्यायला हवी ?

खास बाग, कोल्हापूर<br>६–१–४१

**वि. स. खांडेकर**

# वद्य अष्टमी



खरोखरीच छान चित्र होतें तें. काळ्याकुट्ट मेघांतून जणुं कांहीं अंधाराचा पाऊस पडत होता. पण त्या काळमेघांतूनच चिमुकली चंद्रकोर हंसत हंसत डोकावून पहात होती. ' आशेचेंच चित्र असलें पाहिजे हें ' असें वाटून मीं खालीं दृष्टि वळविली; पण माझी निराशा झाली. त्या चित्राखालीं 'आत्मा' हीं अक्षरें छापण्याची मुद्रकाला लहर आली होती !

मीं पुन्हां त्या चित्राकडे पाहिलें. ' आत्मा ' या नावाचें स्वारस्य कांहीं केल्या माझ्या लक्षांत येईना. वेदान्त सोडून आत्मा चित्रकलेकडे कधीं वळला, अशा अर्थाचा प्रश्न मनांत येऊन माझें मलाच हंसूं आलें. चित्राखालीं एक छोटी कविताहि छापली होती. तिच्यावरून तरी या ' आत्म्या ' चा कांहीं उलगडा होईल म्हणून मी ती वाचण्याचें धाडस केलें; पण चित्राचा अर्थ कवितेच्या साहाय्यानें लावायचा म्हणजे किंवड्या मनुष्याला एखादी गोष्ट सांगण्याकरितां बहिऱ्या माणसाला मध्यस्थ करण्यासारखेंच होतें. त्या कवितेनें चित्रावर प्रकाश पडण्याऐवजीं त्याच्यांतील अंधारांत भर मात्र घातली.

" समुद्रांतून आधीं हलाहल बाहेर आलें, म्हणून त्यांत अमृत नव्हतें काय ? " असा त्या कवितेंत कविमहाशयानीं मोठ्या दिमाखानें वाचकांना प्रश्न केला होता. आजारी पडल्यावर या कवींना अमृत सोडून माझ्यासारख्या डॉक्टरचें औषधच घेतलें पाहिजे, असा टोमणा मनांतल्या मनांत मारून मी पुन्हां त्या चित्राकडे पाहूं लागलों.

पहातां पहातां मला आमचा कॉलेजातील आत्म्याविषयींचा वाद आठवला. दहा बारा वर्षांपूर्वींची ती गोष्ट. पण दररोज अनेक रोगी पाहिले तरी त्यांतील एखाद्याचा चेहरा जसा डॉक्टर जन्मांत विसरत नाहीं, त्याप्रमाणें कॉलेजांत आम्ही हरघडी वादविवाद करीत होतों तरी त्या वादाइतका दुसरा कुठलाच वाद माझ्या लक्षांत राहिला नाहीं. त्या वादांतल्या साऱ्याच गोष्टी विलक्षण होत्या. आमचें कॉलेज होतें एका संस्थानांत. त्यावेळीं तिथल्या कारभाऱ्यापुढें एक राजद्रोहाचा खटला चालला होता. अगदीं याच वेळीं त्या कारभाऱ्याला संस्थानिकांनीं ' दिवाणबहादुर ' ही पदवी मिळवून दिली. या

पदवीदानाचा अर्थ न ओळखण्याइतके लोक कांहीं दुधखुळे नव्हते. संस्थानी नोकर म्हणजे आधींच ताटाखालचें मांजर. त्यांत चांदीच्या वाटींतलें दूध प्यायला मिळाल्यावर बोलायलाच नको! घटकाभर आवेशानें बोलल्याबद्दल त्या बिचाऱ्या आरोपीला जन्मठेप शिक्षा होणार हें सारे लोक ओळखून चुकले.

'दिवाणबहादुर' पदवी मिळाल्याबद्दल त्या गृहस्थाला गांवांत मेजवान्या काय झाल्या आणि त्याचे फोटो किती निघाले! 'दिवाण बहादुर पटवर्धन' म्हणून वर्तमानपत्रांत त्याचा जो फोटो आला तो पाहून तर साऱ्या लोकांनीं नाकें मुरडलीं. पण त्या खटल्याचा निकाल झाला मात्र, आणि तोच फोटो घरोघर दिसूं लागला. दि.ब.नीं आरोपीला निर्दोषी सोडून दिलें होतें.

खटल्याचा निकाल लागला त्या दिवशीं रात्रीं आमच्या क्लबांत जणुं कांहीं राष्ट्रीय सभाच भरली होती. त्यावेळीं क्लबाजवळून जाणाऱ्या मनुष्याला आंत राणा भीमदेव नाटकाच्या तालमी चालल्याचा ग्वास भास झाला असता. पहिल्या पहिल्यांदा जो तो अहमहमिकेनें दिवाणांचें अभिनंदन करीत होता. पण स्तुतीला उधान येऊन गेल्यामुळेंच कीं काय, हळूहळू तिला ओहोटी लागली. इतिहासाचा एक विद्यार्थी उद्गारला, "यात महाराजांचा कावा आहे कांहीं तरी; नाहीं तर काय छाती होती या दिवाणाची आरोपीला सोडण्याची?" वाङ्मयाचा एक अभ्यासक त्याला पाठिंबा देत म्हणाला, "आमचे इतिहासाचार्य म्हणतात तेंच खरं. नाटकांत व्हिलन् नाहीं का सज्जनाचं सोंग आणीत?" तत्त्वज्ञानाचे उपासक उसळून म्हणाले, "अहो भाषाभक्त, चुकतां आहां तुम्ही, हें सज्जनाचं सोंग नाहीं—आत्मपूजन आहे हें आत्मपूजन!"

बिचारा क्लबाचा आचारी त्या दिवशीं अगदीं कंटाळून गेला. त्यानें मनांतल्या मनांत दिवाणबहादुर पटवर्धनांना शिव्यांची लाखोली वाहिली असेल. तब्बल दीड तास पानावर बसून आम्हीं आत्मपूजनाचा वाद केला. "दिवाणाला न्यायाचा पान्हा फुटला तो कांहीं उगीच नव्हे. जवळ माया भरपूर आहे. तेव्हां लोकप्रियता संपादन करण्याची इच्छा झाली बेट्याला! कांहीं झालं तरी हें आत्मपूजनच!" हा निकाल देऊन आम्हीं पानांवरून उठलों.

दुसरे दिवशीं आमच्या कॉलेजांतील एका समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति करण्याकरतां आम्हीं दिवाणांकडे गेलों. त्यांच्या टेबलावरील

जुईची माळ घातलेला फोटो पाहून आम्ही थक्कच झालो, स्वतःचा फोटो टेबलावर ठेवून त्याला माळ घालणारा मनुष्य——मनुष्य कसला मूर्तिमंत अहंकारच तो ! त्यांच्या बंगल्याबाहेर पडताच मी म्हणालों, “ आपला तर्कच खरा. पक्का आत्मपूजक आहे हा. ”

“ अन मौज ही कीं या आत्म्याचा फोटो काढता येतो अन् त्याला फुलांची माळहि घालतां येते. आत्म्याविषयींचें गीतेंतलें तत्त्वज्ञान साफ चुकीचें आहे असं दिवाणबहादुरांचं मत दिसतं. ” एकानें माझ्या बोलण्यावर मल्लीनाथी केली.

पुढें वैद्यकीचें शिक्षण घेण्याकरिता मी मुंबईला गेलों, तेव्हा हा प्रसंग मला पुनःपुन्हां आठवत असे, प्रोफेसरांनीं शारीरशास्त्र आम्हांला शिकविलें; पण शरीरांत आत्मा कुठें असतो हें त्यांनीं आम्हाला कधींच सांगितलें नाहीं ! ते बिचारे सांगणार तरी काय ? वनस्पतिशास्त्रज्ञ फणसाचें फूल कसें असतें तें सांगूं शकेल काय ? पुढे पुढें इस्पितळांत रोग्यांशीं संबंध आल्यापासून तर माझी खात्रीच झाली कीं, आत्मा ही अमृताप्रमाणें कविकल्पनेनें निर्माण केलेली चीज आहे. माणसाला आत्मा असता तर माझ्यापुढें खाटांवर तळमळणाऱ्या जीवांपैकीं अनेकांना इस्पितळाची पायरी कधींच चढावी लागली नसती ! त्या खाटांवरून ऐकूं येणारे कण्हणें म्हणजे आत्म्याच्या अस्तित्वाविरुद्ध असलेल्या साक्षीच होत्या ! नवऱ्याच्या प्रतापानें साऱ्या शरीरावर गळवें उठलेली अठरा वर्षांची पोर, गर्भारपणीं गिरणीत मरेपर्यंत काम करून क्षयाला बळी पडलेली कोकणी बाई, महालक्ष्मीच्या शर्यतीकडे जाणाऱ्या मोटारीखालीं सांपडून पांगळा झालेला हमाल, एक ना दोन—किती उदाहरणें मीं पाहिलीं. त्या नवऱ्याला, त्या गिरणीच्या मालकाला, महालक्ष्मीला जुगारांत लक्ष्मी मिळेल या आशेनें धांवणाऱ्या मोटारीच्या मालकाला—या सर्वांना आत्मा असता तर—पण तो असणार कुठून ? कांहीं माणसें स्वभावतःच चांगलीं असतात, कांहीं जन्मतःच वाईट असतात. पण माणसांना आत्मा असतो, तो जागृत होतो, अंधारात उगवणाऱ्या चंद्राप्रमाणें वाईट माणसांमध्येंहि तो जागृत झालेला आढळतो, या साऱ्या कविकल्पना ! जग आत्मपूजक आहे हें खरें. पण आत्मा या शब्दाचा त्याचा अर्थ मात्र निराळा आहे. स्वतःला जें हवें वाटेल, आपल्याला ज्यांत सुख होईल, त्यालाच तें आत्मा म्हणत असतें !

कारंजाची कळ दाबतांच त्यांतील पाणी जसें तुषारांच्या रूपानें वर उडूं लागतें, त्याप्रमाणें त्या चित्राखालच्या ' आत्मा ' या नांवानें माझ्या सर्व आठवणी उचंबळून आल्या. तसें पाहिलें तर दहा बारा वर्षांपूर्वी राजद्रोहाच्या एका खटल्यांत योग्य न्याय देणाऱ्या व घरीं आपल्याच फोटोची पूजा करीत बसणाऱ्या दिवाणबहादुर पटवर्धनांचा माझ्या आयुष्याशीं काय संबंध होता ? पण—

" डॉक्टर, डॉक्टर. "

मासिक टेबलावर टाकून मी दरवाजाकडे गेलों. माझा गडी दरवाजा उघडीत होता. दरवाजा उघडतांच अंगाला झोंबणारा गार वारा व इनामदारांचा गडी या दोघांनीहि बरोबरच आंत प्रवेश केला.

इनामदाराच्या घरीं संध्याकाळीं आलेल्या एका पाहुण्याच्या छातींत कळ येते आहे, एवढें चिठ्ठीवरून मीं ताडलें. दरवाजांतून बाहेर पाहिलें. अंधार एखाद्या राक्षसाप्रमाणें जणुं काहीं खायला येत होता. रातकिड्यांची कर्कश किरकिर त्याच्या दातांच्या आवाजासारखी मला वाटली. आकाशाकडे पाहिलें तों तें काजळी ढगांनीं व्यापून गेलें होतें. त्या बागुलबोवांना भिऊनच कीं काय, चांदण्या कुठें तरी लपून बसल्या होत्या. आणि चंद्र—कृष्ण पक्षांतली अष्टमी होती त्या दिवशीं. बाकी पौर्णिमा असती तरी त्या काळ्या ढगांच्या चक्रव्यूहांतून बाहेर पडणें त्याला अशक्य होतें म्हणा.

असल्या हवेंत अपरात्रीं इनामदाराच्या घरीं जायचें माझ्या जीवावर आलें. आतां औषध पाठवून द्यावें आणि सकाळीं—पण हृदयाचा विकार असेल तर ? सकाळीं तिथें सान्त्वनाला जायचें आहे थोडेंच !

जरूर तीं औषधें मी गोळा करूं लागलों. जाण्याचा निश्चय म्हणजे माझ्या आत्म्याचा शरीरावरचा विजय असें मला क्षणभर वाटलें. पण दुसऱ्याच क्षणीं कुणी तरी त्या निश्चयाची चिरफाड केली. परक्या गांवांत पोटासाठीं येऊन राहिलेला डॉक्टर मी. माझा जमहि अजून बसायचा होता. इनामदारांच्या घरीं मी आतां गेलों नाहीं तर ते रागावतील. असल्या बड्या कुळाचें मन मोडणें बरें नव्हे. माझ्या निश्चयाच्या मुळाशीं हे विचार नव्हतेच असें म्हणतां येईल का ? समोरच्या मासिकातील चित्राबरोबर दिवाणबहादुर पटवर्धनांचें चित्रहि माझ्या डोळ्यांपुढें उभें राहिलें.

रोग्याला त्रास होऊं नये अशा बेतानें टेबलावरला दिवा ठेवला असल्या-मुळें त्याचा चेहरा मला नीटसा दिसला नाहीं. मी नाडी पाहिली व " काळजी करण्यासारखं काहीं नाहीं " असें म्हणत एक मिश्रण तयार करून दिलें. "घटकाभर स्वस्थ पडूं द्या यांना, मग पुनः प्रकृति पहातों." असें मी इनाम-दारांना सांगताच ते हलक्या पावलांनीं खोलीबाहेर गेले. दुसरा काहींच उद्योग नसल्यामुळें मी दिव्यानें प्रकाशित झालेल्या भागाचें निरीक्षण करूं लागलों.

टेबलावरल्या फोटोकडे माझी नजर गेली अन्—

माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. दिवाणबहादुर पटवर्धनाच्या घरीं पाहिलेला त्यांचा तो फोटो—आज फुलाची माळविळ नव्हती घातली त्याला. जिज्ञासा जागृत झाली कीं, ती वायुवेगानें धावूं लागते. पलंगावरले गृहस्थ दिवाणबहादुर पटवर्धनच आहेत कीं काय हें जाणण्याची उत्सुकता माझ्या मनांत इतकी प्रबळ झाली कीं, बाहेर जाऊन इनामदारांना विचारावें म्हणून मी खुर्चीवरून उठलों देखील. उठता उठता माझी नजर कपाटावर ठेवलेल्या लहान चामडी बॅगकडे गेली. तिच्यावर पांढरीं अक्षरें लकलुकत होतीं. मीं हळूच कपाटापाशीं गेलो व तें नाव पाहिलें—'दिवाणबहादुर रा. ब. पटवर्धन.'

मासिकांतलें चित्र, टेबलावरचा फोटो, कॉलेजातील आठवण, पलंगावर स्वस्थ पडलेलें दिवाणबहादुरांचें शरीर या सर्वांनीं माझ्या मनांत पाठशिव-णीचा खेळ सुरू केला. मन कसें त्रासल्यासारखें झालें. इतक्यात बाहेरून एक गंमतीचा संवाद ऐकूं येऊं लागला.

" कुठं आहे चांदूमामा ? " इनामदाराचा धाकटा मुलगा विचारीत होता.

" चांदूमामा आजारी आहे म्हणून आला नाहीं, बाळ. " इनामदारांनीं उत्तर दिलें.

" आजाली आहे ? बू झालाय त्याला ! "

" बू झालाय, बू बरा झाला कीं येईल हं तो. "

चांदूमामाच्या धाकट्या भाच्याची एवढ्याने समजूत पडली असे वाटलें. पण इंग्रजी तिसऱ्या यत्तेंत शिकणारा त्याचा थोरला भाचा मामाची ही लंगडी सबब ऐकून थोडाच गप्प बसतो !

२ सूर्य.

तो वडिलांना म्हणाला, " आज वद्य अष्टमी आहे म्हणून चंद्र नाहीं उगवला अजून. आतां बारा वाजल्यावर उगवणार. नाहीं हो दादा ? "

अज्ञानांत सुख असतं याची दादांना या वेळीं आठवण झाली असेल. दटावणीच्या स्वरांत ते थोरल्या मुलाला म्हणाले, " चांदूमामाला ताप आलाय खूप आज. " चंद्र बारा वाजतां उगवणार असें म्हटलें कीं, आपला धाकटा भाऊ तेवढा वेळ जागत बसण्याचा हट्ट धरील, हें आतां त्या थोरल्या भावाच्या लक्षांत आलें असावें. तो क्षणभर गप्प राहिला. पण खारीला पिंजऱ्यांत ठेवलें म्हणून ती स्वस्थ थोडीच बसते. तो लगेच वडिलांना म्हणाला, " काल एक गम्मत शोधून काढली आहे मी, दादा ! " त्याच्या गमतीचें अभिनंदन करण्याच्या स्थितींत दादा नव्हते. पण त्याला त्याची थोडीच पर्वा होती. तो पुढें म्हणाला, " शुद्ध प्रतिपदेपासून चंद्राची एक एक कला वाढते, आणि वद्य प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एक एक कमी होते. होय ना, दादा ? या साऱ्यांची बेरीज करून तीन दिवसांत त्यांची सारखी वांटणी करायची. म्हणजे किनई दररोज अष्टमी होईल. ही अष्टमी मात्र पहिली हवी हं ! म्हणजे दररोज संध्याकाळीं चंद्र उगवेल, अन् रात्रीं बारा वाजतां मावळेल. मग आमच्या बाबूला चांदूमामाची वाट बघत बसायला नको. दिवेलावणी झाली कीं चांदूमामा आला. "

या नवीन योजनेचें बाबूनें हंसून खिदळून स्वागत केलें. आपला थोरला मुलगा परमेश्वरालाहि अंकगणित शिकवूं इच्छितो हें पाहून दादांनाहि हंसूं आलें.

हा संवाद ऐकतां ऐकतां माझ्या मनांत मात्र निराळेच विचार येऊं लागले. सृष्टीनें चांदण्यांची वाटणी विषम रीतीनें केली नसती तर दररोज अष्टमीचें चांदणें पृथ्वीवर पडलें असतें. चांगुलपणाचीहि स्थिति चांदण्यासारखीच नाहीं का ? मनुष्याच्या अंतःकरणांतहि अमावास्या अन् पौर्णिमा असतील. पण सरासरी काढली तर अष्टमीच प्रत्येकाच्या वांट्याला यायची ! चांगलीं माणसें वाईट होतात तेव्हां शुद्ध अष्टमीचा अनुभव येतो. वद्य अष्टमी म्हणजे वाईट माणसांत दिसून येणारी माणुसकी ! निम्मी रात्र झाल्यावर जसा वद्य अष्टमीचा चंद्र उगवतो त्याप्रमाणें वाईट माणसांच्या आयुष्यांतहि आत्मजागृति होत असेल.

पण जगांत आत्म-जागृति आहे का ? कीं आत्म-पूजनाला स्वार्थी लोकांनीं दिलेलें हें गोंडस नांव आहे ? या प्रश्नाचा विचार करूं लागण्यापूर्वींच इनामदार आंत आले व त्यांनीं दोन गुलाबाचीं फुलें माझ्या हातांत ठेविलीं. माझ्या आवडत्या फुलांना मीं माझे प्रश्न विचारले असते— पण दिवाणबहादुर एकदम उठून बसल्यामुळें त्यांच्याकडे माझें लक्ष गेलें.

" बरं वाटतंय ना आतां ? " मीं प्रश्न केला.

" कळविळ कांहीं नाहीं. "

" स्वस्थ पडा आतां. "

" पडतोंय; पण कळ आली कशी हें डॉक्टरांना सांगायला नको का ? पांचसात वर्षं हृदयाचा विकार आहे मला. आनंद अगर दुःख यांचा अतिरेक झाला कीं तो उचल खातो असं डॉक्टर म्हणतात. खरं ना हें ? " मीं होकारार्थी मान हालविल्यावर ते पुढें बोलूं लागले.

" पण आज मला इतका आनंद झाला कीं—माझ्या थोरल्या भावाचा फोटो किती वर्षं शोधीत होतों मी. परवां कळलं कीं, या इनामदारसाहेबांचे वडील अन् तो डेक्कन कॉलेजांत बरोबर होते म्हणून. यांच्याकडे चौकशी केली, अन् त्याचा फोटो आहे असं समजलं मात्र, तावडतोब निघून आलों. हें वय, प्रवासाचा त्रास, अन् त्यांत हा फोटो पाहून झालेला ब्रह्मानंद—

त्यांनीं उशीजवळून उचलून पुढें केलेला फोटो मी हातांत घेऊन पाहूं लागलों. त्या फोटोकडे पाहून मी लगेच टेबलावरल्या फोटोकडे नजर वळविली. त्याबरोबर ते म्हणाले, " टेबलावरल्या फोटोंत अन् या फोटोंत साम्य आहे का कांहीं ? "

" बरंचसं आहे कीं. "

" या साम्यानंच माझ्या हातून एक चांगली गोष्ट करविली. "

मी व इनामदार उत्सुकतेनें त्यांच्याकडे पाहूं लागलों.

" दहा बारा वर्षांपूर्वीं मी दिवाणबहादुर झालों. त्यावेळीं माझ्यापुढं एक राजद्रोहाचा खटला होता. संस्थानिकांची इच्छा मी आरोपीला अगदीं जबर शिक्षा करावी. मी केलीहि असती. भाषणांतल्या एका कडक शब्दाबद्दल एक एक वर्ष सक्तमजुरीसुद्धां पूर्वीं मी दिली असेल. पण—पण—त्या खटल्याच्या निकालाच्या आदल्याच दिवशीं असं झालं—"

दिवाणबहादुर मान वळवून टेबलावरील फोटोकडे पाहूं लागले. आपल्या स्वरांतला गहिंवर आणि डोळ्यांतलें पाणी आमच्यापासून लपविण्याचा ते प्रयत्न करीत होते. पण चंद्र ढगाआड लपला तरी चांदण्याला कुठें तसें लपतां येतें ? त्या राजद्रोहाच्या खटल्याचा निकाल झाला त्या दिवशीं आम्हीं विद्यार्थ्यांनीं दिवाणबहादुरांना ' आत्मपूजक ' ही पदवी देऊन टाकली होती. पण अहंकारापेक्षां निराळा असा आत्मा दिवाणबहादुरांत वास करीत असेल अशी शंका त्यावेळीं आमच्यापैकीं कुणालाच आली नव्हती !

" त्या दिवशीं असं झालं—" दिवाणबहादुरांचें मन थोडेंसें शान्त होतांच ते पुढें बोलूं लागले, " दिवाणबहादुर ही पदवी मिळाल्यामुळें आनंद गगनांत मावेनासा झाला होता. मनांतल्या मनांत तुम्हाला हंसं येईल कदाचित् माझं; पण ती पदवी मिळाली त्या दिवशीं जगांत दुःख म्हणून कांहीं गोष्ट आहे हें अगदीं साफ विसरून गेलों होतों मी. पत्रं, तारा, मेजवान्या, फोटो यांचा नुसता पाऊस पडत होता. माझ्या त्या फोटोंपैकीं एक अतिशय चांगला निघाला होता. मला झालेल्या आनंदाचासुद्धा हुबेहुब फोटो निघाला होता म्हणा ना त्यांत ! त्या फोटोकडे पाहतां पाहतां मला तो पूर्वीं पाहिल्यासारखा वाटूं लागला. टेबलावर फोटो आहे तोच तो."

दिवाणबहादुरांच्या चेहऱ्यावरून आम्हीं फोटोकडे एकदां दृष्टि वळविली व पुन्हां त्याच्याकडे पाहूं लागलों.

दिवाणबहादुर लहानसा सुस्कारा सोडून म्हणाले, " हा फोटो पहातांच माझ्या सावत्रभावाची मला आठवण झाली; अगदीं हुबेहुब असाच दिसत असे तो. त्याचं शेवटचं दर्शन झालं त्या वेळीं त्याचा चेहरा अगदीं असाच दिसत होता."

खिडकीकडे पहात पहात दिवाणबहादुर सांगूं लागले, " फार जुनी गोष्ट. या इनामदारसाहेबांचे वडील आणि माझा भाऊ दोघेही डेक्कन-कॉलेजांत होते. तो सुट्टींत देखील फार दिवस घरीं रहात नसे. सावत्र मुलावर प्रेम करण्याइतकं माझ्या आईचं हृदय उदार नव्हतं. या साध्या गोष्टीचा परिणाम असा झाला, आमचे वडील त्या वेळीं नगरला का कुठं डेप्युटी-कलेक्टर होते. एकदा त्यांनीं तार करून माझ्या भावाला घरीं बोलाविलं. रात्रीं नऊ वाजतां आला तो घरीं. माझे वडील त्याला रागारागानं कांहीं विचारूं लागले. मी त्या

वेळीं लहान असल्यामुळं सारं कांहीं माझ्या लक्षांत राहिलं नाहीं. पण दोघांचेहि शेवटचे उद्गार अजून माझ्या कानांत घुमत आहेत. 'तूं लेखी माफी दिली नाहींस तर आजपासून तूं मला अन् मी तुला मेलों.' माझे वडील ओरडून म्हणाले.

"'देशासाठीं खरंखुरं मरण यावं असंच मला—'

"'चुप बैस, कारट्या!' वडील त्याला म्हणाले, 'आग लागो तुझ्या देश-भक्तीला. युरोपियन अधिकाऱ्याचा खून करणाऱ्या माणसाशीं तुझा स्नेहसंबंध होता ही गोष्ट उद्यां कोर्टांत सिद्ध झाली कीं-भिकेची झोळी येईल ना सर्वांच्या हातांत. आधींच लेखी माफी दिलीस तर-' उत्तर न देतां माझ्या भावानं वडिलांना नमस्कार केला व हंसत हंसत तो आल्या पावलीं घरांतून निघून गेला. त्याचं तें हंसूं—जणूं कांहीं तो आपल्या आईला भेटायलाच जात होता!" सद्गदित कंठानें दि. ब. म्हणाले, "पुढं त्याचं काय झालं तें कुणालाच ठाऊक नाहीं. त्यानं नांव बदललं होतं म्हणे, कुठल्याशा कटांत सांपडून—"

दिवाणबहादुरांप्रमाणें आमच्याहि डोळ्यांत अश्रु उभे राहिले. ते सद्गदित कंठानें म्हणाले, "मला दिवाणबहादुर पदवी मिळाल्यामुळं झालेला आनंद आणि देशासाठीं मरण यावं अशी इच्छा करतांना त्याला झालेला आनंद–दोन्ही सारखेच म्हणून तर माझा हा फोटो पाहतांना मला त्याची आठवण झाली. त्याची आठवण होतांच माझा आनंद किती स्वार्थी आहे आणि त्याचा आनंद—कपोताचं रक्षण करण्यासाठीं आनंदानं आपलं मांस कापून देणारा शिबि राजाच त्या आनंदाची कल्पना करूं शकेल. या फोटोनं माझ्या अंतःकरणांत एवढं वादळ उत्पन्न केलं कीं, संस्थानिकांच्या मर्जीची पर्वा न करतां मीं त्या राजद्रोहाच्या पोकळ खटल्यांतील आरोपीला निर्दोषी म्हणून सोडून दिलं. त्या दिवसापासून, हा फोटो माझा नसून माझ्या भावाचा आहे असं मानून मी त्याची पूजा करीत आलों आहें."

दिवाणबहादुरांचें बोलणें संपतांच गंभीर घंटानाद थांबल्यानंतर जी शातता देवालयांत पसरते तिचा मला भास झाला. हातांतील गुलाबाचीं फुलें टेबलावरल्या फोटोच्या पायाशीं ठेवून मी जाण्याकरितां उठलों, तों खिडकींतून चंद्रोदय झाल्याचें स्पष्ट दिसलें. दिवाणबहादुरांनीं विचारलें, "आज तिथि कोणती हो?"

'वद्य अष्टमी' मासिकांतील त्या सुंदर चित्राचें चिंतन करीत मीं उत्तरलों.

# परीक्षकाची परीक्षा २

प्रो. परशुराम पांडुरंग पणशीकर आपल्या खोलींत मराठीच्या तासाची तयारी करीत बसले होते. जवळच एक लठ्ठ संस्कृत कोश पडला होता. त्या शब्दसागरांत वारंवार बुड्या मारून ते नवीं नवीं रत्नें बाहेर काढीत व जमाखर्चाच्या वहीची धाकटी बहीण शोभणाऱ्या अशा आपल्या स्मरण-वहींत टिपून ठेवीत. दर तासाला पाच दहा तरी नव्या शब्दांचीं नाणीं निर्माण करायचींच असा त्यांचा अट्टाहास असे. म. गांधींचा दररोज चर-क्यावर सूत काढण्याचा नियम एखादे वेळीं चुकेल. शिवरामपंत परां-जप्यांच्या लेखांत उपरोधिक वाक्य यावयाचें चुकून राहून जाईल. चिंता-मणराव वैद्यांच्या व्याख्यानांत महाभारताचा उल्लेख कदाचित् येणार नाहीं, पण प्रो. पणशीकर यांच्या वर्गांतील अगर बाहेरील व्याख्यानांत नवा शब्द आला नाहीं असें कधींही होणार नाहीं, अशी त्यांची ख्याति होती. 'शब्द–बंबाळ,' 'संस्कृत–समास–शौन्ड' 'चऱ्हाट–चतुर' वगैरे अनेक बऱ्या-वाईट नांवांनीं त्यांचे श्रोते त्यांचा उल्लेख करीत असत. पण प्रोफेसरसाहे-बांनीं 'वेळ फार झाला आहे," याच्याऐवजीं कालातिपात होऊन गेला आहे' अगर 'मी माझें भाषण संपवितों' याच्याऐवजीं 'येथेंच विश्रब्ध विराम पावतों' असे प्रयोग करण्याचें मुळींच सोडून दिलें नाहीं. खरेंच आहे ! 'न्याय्यात् पथात् प्रविचलन्ति पदं न धीराः'

प्रोफेसरसाहेब स्वतःशींच पुटपुटत होते. "छेः हें नाहीं बरोबर जमत! कोल्हटकरांची कोमल कला, गडकऱ्यांचें गोड गुंजन, देवलांची दयाशील दृष्टि आणि खाडिलकरांची–काय सुंदर वाक्य साधतें आहे ? पण हे खाडिल-कर आडवे आले ना इथें ! खाडिलकरांची ओजस्वी शैली हें कसेंसेंच लागतें; त्यापेक्षां शालीन शैली पुरवलें.हे कोल्हटकर, गडकरी, देवल सर्व मवाळ म्हणून यांना अनुप्रासाच्या सांच्यांत कसे हां हां म्हणतां बसवितां आलें ! पण हे खाडिलकर पडले जहाल! काय घालावें खाडिलकरांच्या पुढें? खादी, खाद्य, खान-दानी, खानेसुमारी, किती तरी शब्द आहेत! पण म्हणतात ना कठिण समय येतां कोण कामासि येतो ! या खवर्गांपैकीं एक शब्द उपयोगी पडेल तर शपथ !

खास देखील निरुपयोगी ! हां हां, हा प्रयोग कांहीं वाईट नाहीं ! खाडिलकरांची खुमासदार खुलावट ! बस्स, वाक्य पण वाक्य झालें आहे. जन्मभर विद्यार्थ्यांच्या स्मरणांत राहील असेंच झालें हें वाक्य ! 'प्रेमपूजन' हें नाटक बी. ए. च्या परीक्षेला लावण्यांत फार मोठी चूक झाली आहे. या ग्रंथकर्त्यांत कोल्हटकरांची कोमल कला नाहीं, गडकऱ्यांचें गोड गुंजन नाहीं, देवलांची दयाशील दृष्टि नाहीं, अथवा खाडिलकरांची खुमासदार खुलावट नाहीं." दारावर टक्टक् आवाज झाला. शब्दसमाधीचा भंग झाल्यामुळें प्रोफेसर साहेबांचा विरस झाला. कोश व वही बाजूला सारून ते उठले व त्यांनीं दार उघडलें. सुमारें वीस बावीस वर्षांचा एक तरुण दारांत उभा होता. त्याचा नमस्कार स्वीकारून "या, आंत या," असें प्रोफेसर म्हणाले. तरुण आंत येऊन बसला.

"काय काम होतें माझ्याकडे ?" पृच्छक मुद्रेनें पणशीकरांनीं विचारलें. तरुण कांहीं उत्तर देणार तोंच त्यांनीं विचारलें, "काव्याला प्रस्तावना पाहिजे आहे वाटतें ? तरुण आहांत, तेव्हां काव्यस्फूर्ति व्हावी हें ठीकच आहे. पण मला सध्यां अगदीं आवंढा गिळायला देखील फुरसत नाहीं पहा. 'सात सुनीतें' या एका पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें काम तसेंच भिजत पडलें आहे. पहाण्णव पृष्ठें लिहून झालीं आहेत; पण आणखी तितकींच लिहावीं लागतील असें वाटतें."

"मिश्या मूठभर न् दाढी हातभर अशांतला नाहीं का हा प्रकार होत ?" तरुणानें जरा भीत भीत प्रश्न केला.

"अहो, एकनूर आदमी न् दहानूर कपडा हें विसरूं नका. नकट्या नाकाची उणीव झोंकबाज म्हणण्यापेक्षा नवमौक्तिकयुक्त म्हटलेलें बरें म्हणा— नकट्या नाकाची उणीव नवमौक्तिकयुक्त नथीनें नाहीं का भरून काढतां येत ?"

"पण नथींत मोत्येंच पाहिजेत; समुद्रांतल्या प्रवाळांचें खडक गुंफले तर नाकाचा शेंडाच तुटून खालीं पडायचा !"

"ह:ह: विनोदी दिसतां तुम्हीं. चांगले लेखक व्हाल. तुम्हीं लेखक झालांत म्हणजे तुमच्या पुस्तकाला मी अवश्य प्रस्तावना लिहीन. अहो, ग्रंथ काय कुणीहि लिहील; प्रस्तावना लिहिणें हें काम फार कठीण आहे. ग्रंथ लिहिण्यांत नेव्वळ स्वार्थ असतो. पण प्रस्तावना लिहिणें हा केवळ परार्थ—केवळ परार्थापेक्षां पक्का परार्थ म्हटलेलें बरें म्हणा—प्रस्तावना लिहिणें हा पक्का परार्थ आहे."

" आपल्या बऱ्याच प्रस्तावना वाचल्या आहेत मी." तरुणानें मिस्किलपणानें हंसून म्हटलें.

" बऱ्याच म्हणजे किती ? "

" दहा बारा तरी असतील ! "

" दहा बाराच ! चार आण्यांचें बर्फ पाहून हिमालयाची कल्पना कशी येणार तुम्हांला ? मी आतांपर्यंत १२२–ही साल सुनीतांची धरली तर १२३ प्रस्तावना लिहिल्या आहेत. १२३ ग्रंथकारांना पुढें आणणें म्हणजे कांहीं लहानसहान साहित्यसेवा नव्हे. "

" लहानसहान कोण म्हणेल ? वाङ्मयागणांतील सेंचरी काढणारे प्रस्तावनावीरच आहांत आपण ! "

" बरें बोललांत साधारण. पण सेंचरी हा इंग्रजी शब्द उगीच वापरलांत. त्याच्याऐवजीं धांवा-शतक म्हटलें असतेंत तर वाक्य फार सुंदर झालें असतें. आतां या १२३ प्रस्तावनांपैकीं मला कोणती आवडत असेल तर ती 'सातपानी अंकलिपी' या पुस्तकाला लिहिलेली छोटेखानी एकेचाळीस पृष्ठांची प्रस्तावना ही होय. तिचा आरंभच पहा किती सुंदर साधला आहे. "

प्रोफेसरसाहेबांनीं जवळच्या कपाटांतून एक मध्यम जाड पुस्तक काढलें व ते ते वाचून दाखवूं लागले. क्लोरोफॉर्म दिलेल्या मनुष्याला डॉक्टर जिव्हाळ्याचा भाग कापूं लागला तरी जशी हालचाल करितां येत नाहीं तशी त्या तरुणाची स्थिति झाली. धबधब्याच्या ओघापुढें कागदाची नांव कसचा टिकाव धरणार ? प्रोफेसरसाहेबांच्या प्रस्तावनेच्या प्रवाहांत वाहून जाण्याखेरीज तरुणाला गत्यंतरच उरलें नाहीं. त्याच्या कानांत खालील शब्द शिरले; "अंक आणि लिपि ! अहाहा ! किती सुंदर, सरस, साभिप्राय संयोग आहे हा ! समसमां संयोग कीं जाहला अथवा रत्नं समागच्छतु कांचनेन, या उक्ती या ठिकाणीं अगदीं सार्थ वाटतात. अंक आणि लिपि ! अंक म्हणजे गणित आणि लिपी म्हणजे भाषा ! भाषा व गणित यांचा छत्तिसाचा आंकडा असतो असें म्हणतात ! पण या अंकलिपीच्या तपोवनांत आपलें नैसर्गिक वैर सोडून ऋषीच्या तपोवनांत एकत्र पिणाऱ्या व्याघ्र-हरिणीप्रमाणें अंक व लिपि एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून विहार करीत आहेत ! अंक म्हणजे गणित आणि गणित म्हणजे मूर्तिमंत रुक्षता, अशी लोकांची समजूत आहे.

पण अंक कधीं रुक्ष असूं शकेल काय? वत्साला वत्सलतेनें वल्हविणारा—"

झपाट्यानें जाणारी प्रोफेसरसाहेबांची होडी एखाद्या साध्या धक्क्यानें उलटली तरच आपली सुटका होण्याचा संभव आहे हें जाणून तरुण म्हणाला,

"वल्हविणारा म्हणजे?"

"वल्हविणारा म्हणजे थोपटणारा. अलंकार आहे हा. वल्ह्यानें जसें वल्हवितात तसें हातानें थोपटतात. ऐका पुढें. वत्साला वत्सलतेनें वल्हविणारा, विश्वाच्या विशाल विलासांत विहरणारा, जगाच्या जरदाळु जडत्वाला जीवविणारा—"

"जरदाळु जड नसतो फारसा. जरदाळु आणि जडत्व यांचा कांहींच संबंध नाहीं."

"कांहींच संबंध नाहीं! अहो कोशांत ते दोघे एका पंक्तीला, कदाचित् मांडीला मांडी लावून बसलेले आढळतील. ऐका पुढें. पृथ्वीच्या पापी प्रभावाला पवित्रविणारा—"

"पवित्रविणें! नवीन शब्द दिसतो हा!"

"हो. माझाच शब्द आहे हा. असे नवीन शब्द बनल्याखेरीज—"

"भाषा कशी बनविणार? आणि भाषा ज्यांना बनवितां येत नाहीं ते ती बोलणाऱ्या लोकांना कसें बनविणार? अगदीं खरें आहे आपलें म्हणणें."

"मी असे किती तरी नवीन शब्द बनविले आहेत. घडविणें—"

"हा शब्द जुना दिसतो."

"शब्द जुना पण अर्थ नवा आहे. पवित्रपासून जसें पवित्रविणें तसें घडापासून घडविणें. केळीला घड आला कीं ती घडविली असें म्हणायचें—"

"छान शब्द आहे हा. श्लेष देखील होईल त्याच्यावर! घडविणें, म्हणजे 'घड' विणें."

"उत्तम श्लेष केलात तुम्ही हा! अगदी कोल्हटकर-गडकऱ्यांच्या तोडीचा. तुम्हीं नाटकें लिहाल तर यंदा बी. ए. ला लावलेल्या या 'प्रेम-पूजना' पेक्षां तीं किती तरी सरस होतील. तें जाऊं द्या म्हणा! मी तुम्हांला माझे नवीन शब्द सांगत होतों. तिकीटाला 'तक्तपत्रिका' पेपरमिंटला 'कागद-टांकसाळ—"

"या नव्या शब्दांच्या भरांत आपण आईचा अंक सोडला तो सोडलाच,

' मातृदेवो भव ' असें शास्त्रवचन असल्यामुळें त्याच्याकडेच वळावें हें बरें नाहीं ? "

" खरंच. पुढें वाचायचें विसरलोंच मी. ऐका, पृथ्वीच्या पापी प्रभावाला पवित्रविणारा—"

" वगैरे वगैरे ! इत्यादि नाटकांचा कर्ता, हें जसें नाटकाच्या पहिल्या पृष्ठावर लिहिलेलें असतें त्यातलाच प्रकार हा, पण हीं सर्व विशेषणें आईच्या अंकाचींच का ? "

" अलबत्. माझ्या म्हणण्याचा भावार्थच सांगतों तुम्हाला. मूळ रामायण फार कठीण म्हणून एकनाथानें भावार्थ रामायण सांगितलें तशी आमची आतां ही भावार्थ प्रस्तावना. माझें म्हणणें असें कीं, ज्यांत अंक आहे तें गणितशास्त्र रुक्ष मानणें म्हणजे मोठा वेडेपणा आहे. आईचा अंक कोणाला आवडत नाहीं ? बायकोचा अंक कोणाला आवडत नाहीं ?— "

" केसरीचा अंक कोणाला आवडत नाहीं ? "

" कसें छान बोललांत. अंकशास्त्र म्हणजे दुसरें विश्व आहे. कारण तें या विश्वाप्रमाणेंच शून्यांतून निर्माण होतें. "

" आणि या विश्वाप्रमाणेंच आपली घडामोड न कळूं देतां शेवटीं शून्यांतच विराम पावतें.

" फार क्लिष्ट कोटी झाली ही ! हो, पण या बोलण्याच्या भरांत तुमचें काम काय होतें तें विचारायचें राहूनच गेलें कीं. माझें हें असें होतें पहा. वाङ्मयाची गोष्ट निघाल्यावर भूक नाहीं न् तहान नाहीं. "

" म्हणूनच तर विश्वविद्यालयानें आपल्याला बी. ए. च्या परीक्षेला मराठीला परीक्षक नेमलें आहे. ' येथें पाहिजे जातीचें ' हेंच खरें. "

" हो, पण तुमचें काम काय होतें ? आपटे-स्मृतिदिन जवळ आला आहे त्या प्रसंगीं व्याख्यान देण्याची एखाद्या वाचनालयातर्फे विनंति करण्याकरितां बहुधा आलां असाल. या स्मृतिदिनांनीं अगदीं भंडावून सोडलें बुवा. आतांपर्यंत मेलेल्या लोकांत तीनशें पासष्ट मोठे लोक सहज होऊन गेले असतील. एक दिवस कांहीं स्मृतिदिनाशिवाय सुना जात नाहीं. त्यामुळें वर्षभर सुतकांतच असल्यासारखें वाटूं लागतें. शिवाय या लेखकाचें वर्णन करतांना त्या लेखकाच्या पुस्तकांचीं नांवें तोंडांत येऊं लागतात. त्या

दिवशीं एका वक्त्यानें तर एका ब्रह्मचारी लेखकाच्या नातवंडांची यादीच वाचायला सुरुवात केली. लोक सारखे टाळ्या वाजवूं लागले. याला वाटलें कीं, आपण नवीन माहिती देत असल्यामुळें लोक टाळ्या वाजवून आपलें अभिनंदन करीत आहेत. शेवटीं त्याच्या लक्षांत आलें कीं, केवळ आडनांवाच्या साम्यामुळें आपण फसलों. तीं नातवंडें त्याच आडनांवाच्या दुसऱ्या एका लेखकाचीं होतीं."

"या स्मृतिदिनांखालीं माझ्या कामाची मलाच विस्मृति होईल म्हणून मधेंच बोलतों याची क्षमा करा."

"क्षमा कसली करायची ? सांगा ना खुशाल."

मुसळधार पाऊस थांबलेला पाहून प्रवाशाला जसें व्हायसें वाटतें तसें त्या तरुणाला झालें. तो म्हणाला, "मी बी. ए. चा विद्यार्थी आहें. आज आपल्या मराठीच्या तासाला बसण्याची परवानगी मागण्याकरतां आलों आहें!"

"कोणत्या कॉलेजांत असतां ?"

"कर्वे कॉलेजांत."

"मग माझ्या या शेवटच्या तरी व्याख्यानाला आलांत तें फार बरें झालें. तुमच्या कॉलेजांतल्या त्या मराठीच्या मनुष्याला कांहींच कळत नाहीं. नुकतीच त्यानें कुठल्याशा पुस्तकावर टीका लिहिली होती. त्यांत माझ्या प्रस्तावनेवर फार तोंडसुख घेतलें होतें. काय एक वाक्य होतें पहा त्यांतलें, 'काव्याच्या एखाद्या चोपड्याला प्रस्तावना म्हणून भारुडें जोडणें म्हणजे लहान मुलाच्या खेळांतल्या गाडीला खराखुरा बैल जोडण्यासारखें आहे.' किती मूर्खपणाचें वाक्य ! एक तरी संस्कृत शब्द, एक तरी जाडा समास, एक तरी अनुप्रास असायचा होता त्यांत !"

"मग मी आपल्या तासाला बसतों तर !"

"अवश्य बसा. आजचें माझें व्याख्यान फार महत्त्वाचें आहे. तेवढें ऐकाल तर दुसऱ्या वर्गाऐवजीं तुम्हांला पहिला वर्ग सहज मिळेल."

"म्हणूनच तर मुद्दाम रत्नागिरीहून आलों या व्याख्यानाकरतां. आता-पर्यंत सर्व परीक्षांत मला पहिला वर्ग मिळाला आहे. तो कांहीं करून कायम ठेवला पाहिजे."

"नांव काय बरें तुमचें ?"

" मुकुंद माधव माईणकर. "

" छान आहे. अनुप्रास म्हणजे काव्यच आहे नांवांत. पण तुम्हीं आजच्याचशा व्याख्यानाला आलांत ? "

" प्रेमपूजन नाटक हेंच काय तें परीक्षेला लागलेलें नवें पुस्तक आहे. बाकीचीं सर्व नेहमीं लागणारीं असल्यामुळें त्यांचा अभ्यास करतां आला. "

" या प्रेमपूजनाचा कर्ता तिकडलाच रत्नागिरीकडलाच आहे म्हणे कोणी. आहे का तुमच्या ओळखीचा ? "

मुकुंद चांचरला " हो हो–आहे तर ! "

" काय भाटे आडनांव आहे नाहीं त्याचें ? "

" हो. "

" काय वय आहे या भाट्यांचें ? "

" सुमारें चाळीस पंचेचाळीस असेल. "

" मला वाटलेंच होतें. चाळिशी उलटल्यावर नाटक लिहिणें म्हणजे साठी उलटल्यावर कुस्ती मारण्यासारखें आहे. काय पण वेड्याचें नशीब पहा. कुठल्याशा कंपनीनें घेतलें आणि लगेच विश्वविद्यालयानें बी. ए. लाही लावलें. बुद्धिबळाच्या डावांत प्यादी होते, त्यांतलाच प्रकार हा. शिकलाय तरी का कांहीं हा भाटे ? "

" मॅट्रिक आहेत. "

" मॅट्रिक ? मॅट्रिक म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ? नाटक लिहिणें म्हणजे हरभऱ्याच्या झाडावर चढायचे नसतें; नारळाच्या चढावें लागतें नारळाच्या !"

" बरें मी येतों तर. दुपारीं तासाला येऊन बसतों. "

" या, अवश्य या. आज या प्रेमपूजन नाटकाची आणि त्याच्या कर्त्याची मी चांगलीच हजिरी घेणार आहें. तुमची आणि त्या कर्त्याची चांगली ओळख आहे म्हणतां ? सांगा जाऊन त्याला सगळें. आपली घेतली लेखणी आणि लागला लिहायला. असा घेतों समाचार त्याचा कीं, जन्मभर माझें नांव विसरणार नाहीं. बरें, या आतां. "

मुकुंद नमस्कार करून निघून गेला. प्रोफेसरसाहेब आपल्या कोशांत व नव्या शब्दांच्या वहींत तल्लीन झाले.

* * *

" मुकुंद, आज वर्गात मोठी गंमत होणार यात शंका नाहीं. आमच्या प्रोफेसर पणशीकरांना पांडित्य करतांना पुसट संशय देखील येणार नाहीं कीं, ज्या नाटककारावर आपण कोरडे उडवीत आहों तो विद्यार्थी म्हणून आपलें व्याख्यान ऐकायला येऊन बसला आहे ! "

" अरे यशवंत जरा हळू बोल. भिंतीला देखील कान असतात. "

" पण ते आमच्या मराठीच्या प्रोफेसरांच्याप्रमाणें लांब नसतात. "

" गुरुविषयीं बोलताना जिभेला काहीं तरी हाड असूं दे. कीं पुणें आणि सभ्यता यांची कायमची फारकतच झाली आहे ? "

" काहीं म्हण तूं. घाण पाणी गंगेचं असलें तरी ते घाणच! लग्नाच्या वरातींतील चंद्रज्योति, फुलबाजा आणि नळे उडवनात त्याप्रमाणें पणशीकराची स्वारी भाषणात जाडे जाडे शब्द, मोठे समास आणि लांब लांब अनुप्रास यांचें दारूसामान ठांसून भरते. स्वारी दत्तक आहे म्हणतात; पण ती पैशासाठीं न होतां नांव बदलून अनुप्रासात्मक करतां येईल या आशेनेंच दत्तक झाली असेल. शब्द काय, वाक्य काय नि शिकविणें काय ! सारा भ्रमाचा भोपळा ! ज्ञान म्हणशील तर आंवळ्याएवढें. "

" म्हणजे जवळ जवळ पूर्ण ज्ञानच म्हणेनास. ज्ञान करतलामलकवत् असलें काय अगर आंवळयाएवढें असलें काय, सामान्य दृष्टीनें सारखेंच ! बाकी तुझ्या प्रोफेसरसाहेबांना ' करतलामलकवत् ' हाच प्रयोग अधिक पसंत पडेल, नाहीं ? "

" ज्यांचीं आडनांवें लांबलचक आहेत त्यांना ते अधिक मार्क देत नाहींत, हे आमचें भाग्यच म्हटलें पाहिजे. त्यांच्याबद्दल अशीहि आख्यायिका सांगतात कीं, एका व्याख्यानांत दीड तास झाला तरी त्यांचें पहिलें नमनाचें वाक्य संपलें नाहीं. म्हणून वर्तमानपत्राच्या बातमीदारांना त्यांच्या त्या दिवशींच्या भाषणाचा सारांशच देतां आला नाहीं. नमनाला घडाभर तेल जाळणारे हरिदास आतां जुनेपुराणे झाले. प्रो. पणशीकरांची प्रस्तावना पुरी व्हायच्या आधींच जगांतल्या सर्व राकेल तेलाच्या खाणी कोरड्या ठणठणीत झाल्या अशी बातमी एकाद्या वर्तमानपत्रात आली तर निदान मला तरी ती खोटी वाटणार नाहीं. अरे, त्यांच्याकडे जोडाक्षरविरहित इसापनीति एका मासिकाच्या संपादकानें अभिप्रायाकरितां पाठविली होती म्हणे ! स्वारीनें ज्ञानकोशाचे पांच

दहा भाग भरतील एवढा अभिप्राय लिहिला. तो अभिप्राय छापायचा म्हटला तर निदान पांच वर्षें त्या मासिकाला इतर सर्व विषय बंद ठेवावे लागले असते. शेवटीं प्रोफेसरसाहेबांनीं त्या अभिप्रायाची अति संक्षिप्त आवृत्ति काढली ती मूळ पुस्तकाच्या सातपट झाली. "

" तुम्ही पुणेकर असभ्यतेप्रमाणें अतिशयोक्तींतहि पटाईत दिसतां. एखाद्याच्या मागें हात धुवून लागायचें म्हटलें तरी—"

" या प्रोफेसरांच्या मागें लागायची कुणाची छाती होणार बाबा! चटकन् देतील एखादा जाडा समास अंगावर फेंकून. "

" तें कांहीं का असेना. अडला हरी म्हणून का होईना आजचें त्यांचे व्याख्यान ऐकलें पाहिजे.वेड्याबरोबर वेडें व्हावें लागतें म्हणतात.परीक्षेंत पहिला वर्ग मिळायला पाहिजे तर परीक्षकाची लहर ओळखून तिच्याप्रमाणें आपल्या लेखणीला नाचविलें पाहिजे."

" दुसऱ्याच्या पुस्तकांच्या बाबतीत असें करतां येईल. पण स्वतःच्या पुस्तकाच्या बाबतींत पोपटपंची करणें कुणाला झालें तरी कसें आवडेल ? हें 'प्रेमपूजन' नाटक तुला जास्ती कळलें असेल कीं या समासबहाद्दर पणशीकरांना? समुद्रावर पोहतां येणें निराळें आणि पाणबुड्या होऊन त्यांतलीं मोत्यें काढणे निराळें. शिवाय आपलें नाटक बी. ए. ला लागलें याचा आनंद तरी तुला कुठें उपभोगायला मिळतोय ? खरें सांगू अगदीं, तुला जर वचन दिलें नसतें तर तूंच हें नाटक लिहिलें आहेस असें मी केव्हांच जगजाहीर केलें असतें. लढाईत तलवार गाजवायची एकानें आणि पुष्पवृष्टि दुसऱ्याच्याच मस्तकावर, हे आपल्याला नाहीं बोवा पसंत. "

" पण हें जर मी मुद्दामच स्वार्थासाठीं केलें आहे तर मला त्यांत वाईट वाटण्याचें कारण काय ? सैरंध्रीचे गंधर्वपति गुप्त राहिले, म्हणूनच जसा कीचकवध झाला त्याप्रमाणें माझें नांव गुप्त राहिलें म्हणूनच तर नाटकाला कंपनीकडून भरपूर पैसे मिळाले. नाहींतर ओठ पिळले तर दूध निघेल अशा माझ्यासारख्या पोराची संभावना तिनें नुसत्या चहावरच केली असती. माझे मामा माझ्याबद्दल नाटककार व्हायला तयार झाले, म्हणून तर हें सर्व सुखानें निभावलें. विश्वविद्यालय हें नाटक बी. ए. ला लावील असें मला त्या वेळीं थोडेंच स्वप्न पडलें होतें ? "

" अरे बाबा, या नव्या काळांत स्वप्नीं नसे तें जनीं दिसे, असें कधीं कधीं होतें. बरें—आतां उद्यां एखादी चांगली शिकलेली, सुरूप मुलगी या नाटकावर खूष झाली आणि तिनें या नाटककाराशीं लग्न करण्याचा निश्चय जाहीर केला, तर तूं काय करणार ? तिला मामांच्याच गळ्यांत बांधणार कीं आपलें रहस्य प्रदर्शित करणार ? "

" नाटकावर मुलगी खूष होण्याचें तुझें हें कथानक अद्‌भुतरम्य असलें तरी चांगलें आहे हें मी कबूल करतों. पण उद्यां प्रेमपूजनापेक्षां अधिक चांगलें असें दुसरें एखादें नाटक आढळलें म्हणजे ती त्याच्यावर फिदा व्हायची. गृहलक्ष्मी अशी लक्ष्मीसारखी चंचल असून चालत नाहीं जगांत. "

" जाऊं दे हा वाद. सध्यां खाणावळ हीच आपली गृहलक्ष्मी आहे; आणि नियमितपणात ती मंडळीकांना लाजविणारी आहे. पांच मिनिटें उशीर झाला तर संध्याकाळपर्यंत आपल्याला उपाशीं ठेवायला कमी करणार नाहीं ती ! "

* * *

प्रो. पणशीकरांचें व्याख्यान सुरू झालें होतें. मुकुंद आरोपीच्या मुद्रेनें यशवंताजवळ बसून तें ऐकत होता. भुकेलेला मनुष्य भात वाढण्याची वाट न पाहतां वाढलेल्या भाजीचाच जसा समाचार घेऊं लागतो त्याचप्रमाणें प्रोफेसर महाशयांनीं अर्पणपत्रिकेच्या पृष्ठावर पहिला हल्ला चढविला. त्यांनीं प्रथमतः अर्पणपत्रिका वाचली. ". माझ्या प्रिय भाच्यास समर्पण; तूंच मला नांव मिळवून दिलें आहेस; मग ही कृति तुला अर्पण करणें म्हणजे देवानें दिलेल्या दौलतींतला अंश त्याला नैवेद्य म्हणून देण्यासारखेंच आहे. तुझा कामापुरता मामा— "

पणशीकरांची मल्लिनाथी सुरू झाली. " प्रिय भाच्यास ! किती कर्णकटु शब्द आहे हा. 'प्रिय भागिनेयास' असें लिहिलें असतें तर किती गोड वाटलें असतें. गांवढळ भाषा हा या नाटकांतला एक मोठा दोष असून तो अर्पणपत्रिकेपासून भरतवाक्यापर्यंत सर्वत्र आढळतो. घ्या, टिपून घ्या; फार महत्त्वाचा प्रश्न आहे. " वकील आपल्या साक्षीदाराला जसे सूचक प्रश्न विचारतो त्याचप्रमाणें पणशीकरांचें हें सांगणें होतें. त्यानीं प्रश्न महत्त्वाचा म्हटला कीं तो महत्त्वाचा ठरणारच हें विद्यार्थी ओळखून होते. सर्व विद्यार्थ्यांनीं 'प्रेमपूजना' ची भाषा गांवढळ आहे हें टिपून घेतलें.

मात्र तें लिहून घ्यावयाला मुकुंदाचा हात धजेना. आपली आपण स्तुति करणारा मूर्ख असतो; पण आपली निंदा आपणच लिहून घेणें, ही गोष्ट शत मूर्खांच्या हातून देखील होणें शक्य नाहीं. प्रोफेसर साहेबांची आगगाडी पुढें सुरू झाली. "या नाटककारांत कोल्हटकराची कोमल कला नाहीं, गडकऱ्याचें गोड गुंजन नाहीं, देवलाची दयाशील दृष्टि नाहीं, अथवा खाडिलकरांची खुमासदार खुलावट नाहीं. फार फार महत्त्वाचा प्रश्न आहे हा." सेनापतीचा हुकूम होताच फैर झाडणाऱ्या सैनिकाप्रमाणें विद्यार्थ्यांचीं फाउंटन पेनें भराभर चालूं लागलीं. मुकुंद मात्र एक अक्षरहि लिहून घेत नव्हता. त्याच्या शेजारच्या एका विद्यार्थ्यानें तर त्याला म्हटलें देखील, "काय हो, मुद्दाम या तासासाठीं रत्नागिरीहून आलात आणि एक अवाक्षरहि टिपून घेत नाहीं तुम्हीं. पर्वणीच्या दिवशीं समुद्राजवळ जाऊन कोरडेच राहणार वाटतें ?" मागच्या बांकावरील एक विद्यार्थी उद्गारला, "आजचा एक एक शब्द म्हणजे लाखाचा आहे." त्याच्या या उद्गारांनीं कुणीतरी आपल्या काळजाचे लचके तोडल्यासारखें मुकुंदाला वाटलें. प्रोफेसरसाहेब पुढें बोलूं लागले, "आंता एक महत्त्वाचा प्रश्न नाटकाचा हेतु. प्रेमपूजन या नावावरून प्रेम हा परमेश्वर आहे असें नाटककाराला दाखवायचें होतें असें दिसतें. पण शेवटीं बालविधवा असलेल्या नायिकेशीं नायक पुनर्विवाह करीत नाहीं यावरून त्याला प्रेमाचें महत्त्व दाखवायचें होतें असें दिसत नाहीं. सारांश, कडबोळें जसें अठरा धान्यांचें असतें तसें हें नाटक आहे. त्यांत एक हेतु म्हणून दाखवितां येणार नाहीं. आपल्याला काय लिहायचें हें नाटककाराला मुळींच कळलें नाहीं म्हणूनच मी म्हणतों कीं या नाटककारात कोल्हटकराची कोमल कला नाहीं, गडकऱ्यांचें गोड गुंजन नाहीं, देवलांची दयाशील दृष्टि नाहीं, अथवा खाडिलकराची खुमासदार खुलावट नाहीं."

आतां मात्र मुकुंदला दम धरवेना. तो उठून अदबीनें म्हणाला, "मी एक प्रश्न विचारूं काय ?"

दुसऱ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांपुढें पांडित्य प्रगट करण्याची ही संधि व्यर्थ दवडण्याइतके प्रोफेसरमजकूर खुळे नव्हते. ते म्हणाले, "विचारा; अवश्य विचारा."

"देवलाची दयाशील दृष्टि म्हणजे काय ? देवल दयाळु होते असाच

याचा अर्थ काय? तसा असेल तर या नाटकाचे कर्ते भाटे निर्दय आहेत याला पुरावा काय?"

"पाहिलेंत! तुमच्या कर्वे–कॉलेजांत मराठी मुळींच शिकवितां येत नाहीं असें मी म्हणतों तें कांहीं खोटें नव्हे. देवलांची दयाशील दृष्टि म्हणजे–असें पहा! शारदा नाटकांत देवलांनीं शारदेविषयीं किती अनुकंपा दाखविली आहे—"

"कोल्हटकरांनीं मतिविकारांत चंद्रिकेविषयीं नाहीं का दाखविली? मग कोल्हटकरांची दृष्टि दयाशील आहे असें म्हणावयास काय हरकत आहे?"

"हा कलेचा प्रश्न आहे; त्याला नाट्यशास्त्राचें चांगलेंच अध्ययन पाहिजे. मल्लिनाथ, व्हॉगन, आर्चर वगैरे चांगले वाचले पाहिजेत." हीं नांवें ऐकून आतां टीकाकार सहस्रनामाचा मारा आपल्यावर सुरू होणार हें मुकुंदानें जाणलें व तो खालीं बसला.

"हा हेतूचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे अति–अतीच महत्त्वाचा आहे. त्याचें थोडक्यांत उत्तर म्हणजे या नाटकांत कोल्हटकरांची कला नाहीं, गडकऱ्यांचें गोड गुंजन नाहीं, देवलांची दयाशील दृष्टि नाहीं, अथवा खाडिलकरांची खुमासदार खुलावट नाहीं." मुकुंदाचा चेहरा आंतल्याआंत आवरून धरलेल्या रागानें कठोर दिसत होता; पण विद्यार्थ्यांनीं टाळ्यांच्या कडकडाटांत निरोप दिल्यामुळें प्रोफेसर पणशीकर हास्यमुद्रेनें वर्गाबाहेर पडत होते.

* * *

"मुकुंद माधव माईणकर" प्रो. पणशीकरांनीं नांव उच्चारलें व तोंडी परीक्षेसाठीं मुकुंद त्यांच्यासमोर उभा राहिला. त्याची प्रश्नपत्रिका हातांत घेऊन प्रोफेसर म्हणाले, "माईणकर, रत्नागिरीच्या कर्वे-कॉलेजांतील मराठी अध्यापकाची विद्वत्ता लक्षांत घेतां तुम्हीं आपला पेपर बरा लिहिला आहे यांत संशय नाहीं. मात्र प्रेमपूजन या नाटकाचा हेतु काय आहे हा प्रश्न तुम्हीं अगदींच वेड्यासारखा लिहिला आहे. तो जर व्यवस्थित लिहिला असतात तर तुम्हांला पहिल्या वर्गाला लागणारे गुण सहज मिळाले असते."

मुकुंद कावराबावरा झाला. प्रो. पणशीकर यांचें 'प्रेमपूजना' च्या हेतूविषयीं काय मत आहे हें माहीत असूनहि त्यानें परीक्षेंत तें लिहिण्याचें

टाळलें होतें. पोटच्या पोरावर परक्याच्या हाताची कुऱ्हाड चालवायला पित्याचा हात धजणेंच शक्य नसतें. प्रसंगावधान राखून त्यानें उत्तर दिलें, " माझें उत्तरहि फारसें चूक आहे असें नाहीं. हेतूंच्या बाबतींत मतभिन्नता असणें स्वाभाविकच आहे. भिन्नरुचिर्हि लोकः. "

" भिन्नरुचिर्हि लोकः हा न्याय लावून जर एखादा मनुष्य किराईत साखरेहून गोड असतें असें सांगूं लागला तर तुम्हीं तें खरें मानाल का ? "

" तसें नाहीं, हा बौद्धिक प्रश्न आहे—"

" आणि म्हणूनच तो बुद्धिमान् लोकांनींच सोडविला पाहिजे. बालविधवा नायिकेशीं पुनर्विवाह न करतांहि नायक प्रेमपूजन करतो, असें जें तुम्हीं लिहिलें आहे तें मला मुळींच पटत नाहीं. तुम्हांला नाटककाराच्या या पर्यवसानाचा अर्थच कळला नाहीं. "

" पण आपण लावतां तोच अर्थ बरोबर आहे हें कशावरून ? " पहिला वर्ग हातचा जातो असें वाटून मुकुंदानें निराशेनें सवाल केला.

" मला विश्वविद्यालयानें बी. ए. चा परीक्षक नेमलें आहे म्हणून. तुमचा अर्थ बरोबर असता तर तुम्हांलाच नेमण्यांत आलें असतें. "

" असें झालें म्हणजे कालिदासाचें नाटक परीक्षेला लावलें कीं अर्थ अगर हेतु यांचा कायमचा निर्णय कालिदासावांचून होणारच नाहीं. आणि ज्या अर्थीं कालिदास मेल्यामुळें परीक्षक होऊं शकत नाहीं त्याअर्थीं त्याचें नाटक लावण्याचीहि जरूर रहाणार नाहीं. "

" पहिला वर्ग हातचा जातो म्हणून तुमचें डोकें फिरलें वाटतें ! या हेतूच्या प्रश्नांत तुम्हांला चांगले मार्क मिळाले असते तर तुम्ही खास पहिल्या वर्गात आलां असतां. "

" पण हेतूविषयीं कुणाचें मत खरें मानावयाचें ? ग्रंथकर्त्याचें का वाचकाचें ? "

" अर्थात् ग्रंथकर्त्याचें. जणूं काय आपण ग्रंथकर्त्याचेंच मत लिहिलें आहे असा तुम्ही आव आणीत आहां. पण मला वाटतें कीं, ग्रंथकर्त्याला जर येथें आणून उभें केलें तर तो माझ्याच बाजूनें मत देईल. "

" मुळींच नाहीं. "

" मोठे घमेंडखोर दिसतां तुम्ही माईणकर. प्रेमपूजनाचा कर्ता अगदीं मुठींत असल्यासारखें बोलत आहां ! "

" हेतूच्या बाबतींत ग्रंथकर्त्यांचें मत आपणाला मान्य आहे ना ? "

" निःसंशय. "

" मग माझ्या हेतूच्या प्रश्नाला पूर्ण गुण द्या. "

" तें कां म्हणून ? "

" मीच प्रेमपूजनाचा कर्ता आहें म्हणून. "

प्रो. पणशीकर स्तंभित झाले. मुकुंदानें मामांच्या अर्पणपत्रिकेंतील " तूंच मला नांव मिळवून दिलें आहेस व कामापुरता मामा." या द्व्यर्थी प्रयोगावर प्रकाश पाडला. त्याच आठवड्यांत ' नवा काळां ' तून ' प्रेमपूजना ' चे कर्ते भाटे यांचा त्याच अर्थाचा खुलासा प्रसिद्ध झाला. अर्थात् बी. ए. च्या निकालांत मुकुंद माधव माईणकर हें नांव पहिल्या वर्गांत आलें होतें हें सांगावयाला नकोच.

किती लगबगीनें ती पर्वतापासून दूर झाली !

खळबळ करीत ती पृथ्वीवरून धांवूं लागली !

जणूं कांहीं एखादी नर्तिकाच अभिसारिका होऊन चालली होती.

तिच्या उघड्या डोळ्यांपुढें एकच स्वप्न पुनः तरंगत होतें—निळ्या लाटांतून खदखदां हंसणारा सागर ! ती मनांत म्हणत होती,

' उषेला स्वप्नांत आपल्या प्रियकराची मूर्ति दिसली. पण त्याला शोधायला जाण्याचा कांहीं तिला धीर झाला नाहीं. मी मात्र माझ्या रमणाला शोधून काढायला निघालें आहें. '

तिच्या अंगाचा कण नि कण स्वप्नांतल्या सागराच्या स्मृतीनें पुलकित होत होता.

प्रत्येक वळणावर ती हळूच वांकून पाही. तिला वाटे—पलीकडे सागर लपून बसला असेल. आपण धांवत गेलें तर तो एकदम आपल्याला बाहु-पाशांत घट्ट धरिल. तसें झालें तर आपल्याला त्याला डोळे भरून पाहतांसुद्धां येणार नाहीं.

योजनांमागून योजनें मागें पडलीं. पण सागराच्या हास्याचा खळखळाट कांहीं तिच्या कानावर पडला नाहीं. ती रानावनांतून एकसारखी धांवत होती.

वाट चुकून दमलेला प्रवासी तिचें पाणी पीत पीत म्हणे, " रानांतून वाहणाऱ्या या नदीचें आयुष्य अगदीं फुकट आहे. तिकडे पाणी नाहीं म्हणून पिकें वाळून चाललीं आहेत, अन्न नाहीं म्हणून माणसें तडफडत आहेत, आणि इकडे पाण्याचा हा मोठा प्रवाह कुठेंतरी वाहात चालला आहे. "

नदी हंसत हंसत पुटपुटे, " अगदींच अरसिक आहे हा ! प्रीतीची गोडीच बिचाऱ्याला ठाऊक नसेल. मीं कुठं चाललें आहे ठाऊक आहे का ? सागराला भेटायला ! "

* * *

शेवटीं सरिता सागराला भेटली. दोघांचें जीवन एकरूप झालें. आपल्या

मुखांत खारटपणा कुठून आला हें नदीला प्रथम कळेना. कुणीतरी म्हणालें, " दोन जीव एक झाल्यावर असं व्हायचंच."

सागराच्या दृढ आलिंगनांत आपल्या मुखाला आलेला खारटपणा ती विसरून जाऊं लागली.

पण पर्वतापासून सागरापर्यंतच्या प्रवासांत तिला राहून राहून वाटे, 'आपल्या आयुष्याचा एवढाच का उपयोग आहे? योजनेंच्या योजनें धांवून आपण काय मिळवितों? एक दीर्घ चुंबन, एक दृढ आलिंगन, त्या चुंबनांत प्रवासाचा शीण नाहींसा करण्याची शक्ति आहे; त्या आलिंगनात सारें जग विसरून जायला लावण्याची जादू आहे, पण—

तिची विचारमालिका इथेंच तुटून जाई. तिच्या कानांत त्या प्रवाशाचे शब्द घुमूं लागत : रानांतून वाहणाऱ्या नदीचें आयुष्य अगदीं फुकट आहे. तिकडे पाणी नाहीं म्हणून पिकें वाळून चाललीं आहेत, अन्न नाहीं म्हणून माणसें तडफडत आहेत—

आपल्या प्रवाहाची दिशा चुकली असें तिला वाटूं लागलें. पण—

मनांतले बंडखोर विचार ऐकूं येऊं नयेत म्हणून ती स्वतःशीं मोठमोठ्यानें गीत गाऊं लागली. " प्रीति हेंच जीवनाचें साफल्य आहे. एका चुंबनांत जें सुख आहे, तें उभ्या स्वर्गांतसुद्धां मिळणार नाहीं."

* * *

शतकांमागुन शतकें गेलीं. नदी तशीच वाहात होती, सागराला मिळत होती आणि त्या मीलनानें आपल्या जीवनाचें सार्थक झालें असें मानत होती.

एके दिवशीं कितीतरी माणसांनीं तिच्या या प्रेमसमाधीचा भंग केला. एक मोठा बांध घालून आपल्याला अडवून ठेवण्याचा त्या माणसांचा संकल्प आहे असें तिला कळलें; ती रागानें तांबडीलाल होऊन अकांडतांडव करूं लागली.

पण यंत्राच्या सामर्थ्यापुढें तिच्या रागाला नमतें घ्यावें लागलें.

धरण तयार झालें. आपल्या प्रीतीच्या आड येणाऱ्या त्या धरणाला मनांतल्या मनांत तिनें किती शाप दिले याची गणतीच नाहीं.

* * *

महिन्यांमागून महिने गेले.

धरण पहायला येणारीं माणसें पाण्याच्या त्या अफाट विस्ताराकडे पाहत म्हणूं लागलीं, "या नदीच्या पाण्यामुळें सभोंवतालच्या माळरानांत सोनें पिकायला लागलें आहे."

आपल्या पाण्याचा थेंब नि थेंब माणसांना जगवीत आहे, हें कळल्यावर तिला त्या धरणाविषयीं प्रेम वाटूं लागलें.

नदी पूर्वीइतक्या उत्सुकतेनें आपल्याला चुंबन देत नाहीं, पूर्वीइतक्या आवेगानें आपल्या बाहुपाशांत उडी घेत नाहीं अशी सागराला शंका येऊं लागली. त्यानें तिला खोंचून विचारलें, "तुझें माझ्यावरलें प्रेम आटलं वाटतं?"

तिनें उत्तर दिलें, "खरें प्रेम कधीं आटत नाहीं!"

"मग?" त्यानें कुर्ऱ्यानें प्रश्न केला. नदी हंसत हंसत उत्तरली, "प्रीती-प्रमाणें जीवनाचा दुसराहि एक उपयोग आहे, हें अलिकडेच कळलं मला!"

"कुणी शिकविलें हें तुला?"

"धरणानं."

श्रीमंत ' प्रजासेवक ' वाचण्यांत अगदीं गुंग होऊन गेले होते. लक्ष्मी-सरस्वतीचा हा अपूर्व संगम दृग्गोचर होण्याचें कारण त्या वर्तमानपत्रांत श्रीमंतांवर आलेली कडक टीका हेंच होतें असें मात्र नाहीं. लक्ष्मी पायाशीं लोळण घेत असतांनादेखील सरस्वतीचा वरदहस्त आपल्या मस्तकीं असावा अशी श्रीमंतांची फार इच्छा ! राणीसाहेब गांवाला गेल्या म्हणजे जेवढ्या उत्सुकतेनें ते टपालाची वाट बघत तेवढी नसली तरी दररोजच्या टपालाविषयीं त्यांना वाटणारी उत्कंठा एखाद्या देवभक्ताला शोभण्यासारखी होती. मोटारींत बसून फिरायला जातांनादेखील त्यांचें वाचन चाले. ते नेहमीं म्हणतच कीं ' मारुतीच्या हातांत मोटारीचें चाक आहे. तोंपर्यंत मला मान वर करून बघायचें कारणच नाहीं मुळीं. '

ते गादीवर आले त्याच दिवशीं संस्थानांतील नायकिणींचा बंगला ओस पडला. आपल्या सुरूप पोरींची नव्या श्रीमंतांपाशीं वर्णी लागणार या आशेनें डोळ्यांत तेल घालून बसलेल्या म्हाताऱ्या नायकिणींनीं ' असला कसला ग बाई हा संस्थानिक ! जळळी मेली ही सुधारणा ! ' असे उद्गार त्या वेळीं तळतळून काढले होते. ' प्रजासेवक ' पत्रानें मात्र ' श्रीमंतांनीं या कृत्यानें आपलें रामचंद्र हें नांव सार्थ केलें. ' असा या बाबतींत त्यांचा गौरव केला होता. त्यांच्या साध्या पोषाखांत त्यांचें मन प्रतिबिंबित होत असे. रामचंद्रराव अप्पासाहेबांची स्वारी कुठें फिरायला गेली तरी गौतमबुद्धाप्रमाणें जगाच्या दुःखाकडे त्यांचें चटकन लक्ष जातें, असा लौकिक अवघ्या तीन वर्षांत त्यांनीं संपादन केला होता. ' देवा, महाराजास्नी उदंड औक्ष दे ' असे उद्गार त्यांच्या वाढदिवशीं प्रत्येक खेड्यापाड्यांतून निघत असत. या विलक्षण लोकप्रियतेमुळें अलीकडे त्यांचें मन थोडयाशा प्रतिकूल टीकेनें देखील प्रक्षुब्ध होत असे. स्तुतीच्या पुष्पमालांनीं झांकून गेलेलें मनहि फुलासारखेंच नाजूक होत असतें.

' प्रजासेवकांत 'ल्या टीकेनें आज त्यांच्या मनाचें असेंच मंथन केलें होतें; व त्यामुळें दारांत येऊन उभ्या राहिलेल्या मारुतीकडे त्यांचें लक्षच गेलें

नाहीं. आपल्यावरील टीकेचा भाग त्यांनीं पुन्हां वाचून संपविला व मान उडवीत ते स्वतःशींच म्हणाले, 'अं:! हे संपादक म्हणजे निव्वळ उंटावरले शहाणे! ब्रह्मज्ञान सागावयाला काय जातें यांचें? म्हणे दारूबंदी करा. दारूबंदी करा नि खजिन्यांत काय भरा?'

त्यांनीं वर पाहिलें तों दारांत मारुती ड्रायव्हरच्या पोषाखांत उभा! श्रीमंतांची नजर वर झालेली पहातांच मारुतीनें चटकन् लवून सलाम केला.

"मोटार तयार आहे सरकार!"

"किती वाजले बरें?" डाव्या मनगटावरील घड्याळाकडे पहात श्रीमंत म्हणाले, "चार! तो फोटोग्राफर साडेतीनला येणार होता फोटो घेऊन! अजून पत्ता नाहीं बेट्याचा! आळशी लोकांचीं घड्याळें देखील आळशीच होतात!"

"त्या पुलापर्यंत जाऊन यायला दोन तास तरी लागतील! आतां निघालों तर सहाला परत येऊं. माझी ड्यूटी साताला संपते सरकार!" मारुती भीत भीत म्हणाला.

"सात वाजून गेले यायला तर राजवाड्यांतच रहा म्हणजे झालें." मारुतीच्या चेहऱ्यावर या वाक्यानें खिन्नपणाची छाया पसरली. ती दिसल्यामुळेंच कीं काय श्रीमंत म्हणाले, "अगदीं एक रात्र देखील मुलाला सोडून रहावत नाहीं का रे? बाकी तुझा मुलगा आहेच तसा गुटगुटीत न् गुणी! युवराजांना मागें टाकून शिशुसप्ताहांत पहिलें बक्षीस उगीच नाहीं मिळविलेंन त्यानें. हो, मी तुला सांगायला विसरलोंच होतों. राणीसाहेबांना तुझा हा मुलगा—काय त्याचें नांव म्हटलेंस?

"जया. चांगल्या पायगुणाचा आहे सरकार. त्याच्या बारशादिवशींच मला या पायांची नोकरी लागली!"

"तेव्हां असें कर, प्रजासेवकाच्या संपादकांना मी भेटीला बोलाविलें आहे. ते येऊन जाईपर्यंत तूं जयाला नि त्याच्या आईला मोटारींतून राणीसाहेबांकडे घेऊन जा. जातांना मलाहि पहायचें आहे त्या गुलामाला. मुलें असावींत तर अशीं!"

मारुती सलाम करून निघून गेला. श्रीमंत पुन्हां प्रजासेवकांतील आपल्यावरील टीका वाचूं लागले. शरीराला झालेल्या एखाद्या जखमेकडे

जसा मनुष्याचा हात पुन्हां पुन्हां जातो त्याप्रमाणें मनाला बोंचणारे उद्गार वारंवार वाचण्याची मनुष्याची प्रवृत्ति असते. वाचतां वाचतां त्यांचा स्वर मोठा झाला. “ सरकारी खजिन्यांत दारूवरील कराच्या रूपानें जमा होणारा प्रत्येक पैसा कुठून येतो ? दारूबाजाच्या निढळाच्या घामांत, त्याच्या बायकोच्या अश्रूंत व त्याच्या पोरांच्या रक्तांत भिजून तो आलेला असतो ! लाखों बायकापोरांचीं पोटें जेव्हां रिकामीं रहातात तेव्हां सरकारची तिजोरी भरते ! हजारों पतिव्रतांचीं अंगें बेफाम नवऱ्याच्या मारानें एकीकडे सुजत असतात व दुसरीकडे सरकारी जमाबंदीची रक्कम फुगत असते ! पोटांतल्या आगीनें जळणारीं व बाहेरच्या थंडीनें कुडकुडणारीं दारूबाजांचीं लक्षावधि मुलें देशांत तडफडत असतात म्हणूनच शिशुसप्ताह साजरे करण्याला पाहिजे असलेला पैसा सरकारला मिळत असतो. दारूचें व्यसन सर्रास चालू ठेवून प्रजा सुखी करूं पहाणें म्हणजे वेलीच्या मुळाशीं निखारे घालून तिच्या फुलांची अपेक्षा करीत बसण्यासारखें आहे. ”

दारावरील हुजऱ्याच्या येण्याची चाहूल लागून श्रीमंतांनीं वर पाहिलें. हुजऱ्यानें वांकून सलाम करून एक नांवाचें कार्ड श्रीमंतांच्या हातांत दिलें. त्याच्यावर नजर टाकून श्रीमंत म्हणाले, “ पाठवून दे त्यांना आंत ! ”

* * *

“ महाराजांनीं माझें म्हणणें शान्तपणानें ऐकून घेतल्याबद्दल मी अत्यंत आभारी आहें, ” प्रजासेवकाचे संपादक म्हणाले.

“ तुमचें म्हणणें ऐकण्याकरतांच तर तुम्हांला बोलाविलें होतें. पण तुमच्या तब्बल तासाच्या व्याख्यानानें माझ्या मतांत मात्र काडीइतका देखील फरक पडला नाहीं. ”

“ संस्थानाचें दुर्दैव म्हणायचें ! ”

“ एकीकडे शिक्षण सक्तीचें झालें पाहिजे असें तुम्हींच म्हणतां व दुसरीकडे दारूबंदी करावी म्हणून तुम्हींच सांगतां. दारूबंदीप्रमाणें जमाबंदीकडेहि पाहिलें पाहिजे. दारूबंदी केली तर शिक्षणाला पैसा कुठून मिळणार ? ”

“ दारूचा वास येत असलेलें विद्यामृतच आम्हांला पाजा असें कुठें म्हणणें आहे प्रजेचें ? ”

“ उंटावरून शेळ्या हांकणाराला डोंगरावरील कांट्याकुट्यांची कल्पना

नसते हेंच खरें. लहान मुलांच्या आरोग्याकडे लोकांचें लक्ष लागावें म्हणून संस्थानानें एवढा मोठा शिशुसप्ताह परवां केला. दारूचें उत्पन्न शून्य असतें तर हा खर्च संस्थानला करतां आला असता काय ?"

"शिशुसप्ताह वाईट आहे असें नाहीं म्हणत मी ! पण जेथें दारूबाज बाप पोर जेवलें आहे कीं उपाशीं आहे याचीच पर्वा करीत नाहीं तेथें शिशुसप्ताहापासून त्याला अगर त्याच्या मुलांना काय फायदा होणार ?"

"लोक दारूबाज होतात त्याला आम्हीं काय करायचें ?"

"सरकार दारूचीं दुकानें घालण्याला परवानगी देतें म्हणून लोक दारू-बाज बनतात. आंधळ्याच्या वाटेंत खड्डा खणून ठेवायचा आणि तो त्यांत पडला म्हणजे 'दुसरी वाट नव्हती काय जायला ?' असें वर विचारायचें तशांतलाच प्रकार होतो आहे हा सरकार !"

"उभ्या जन्मांत दारूच्या थेंबाला शिवलों नाहीं मी कधीं."

"हें महाराजांना निःसंशय भूषणावह आहे. पण रामाचें एकपत्नीव्रत डोळ्यांपुढें असूनहि रावणानें परस्त्रीचा अभिलाष धरलाच कीं नाहीं ?"

"शिक्षणाचा प्रसार झाला कीं दारूचें व्यसन हळुहळू होईलच कमी."

"मला नाहीं वाटत तसें. अग्नी जवळ असला कीं लोणी वितळणारच. मग तें थंडीनें किती का घट्ट झालेलें असेना ! मोहाचें जाळेंच लोकांच्या वाटेंतून काढून टाकलें पाहिजे. त्या जाळ्यावरून लोक उड्या मारून जातील असला आशावाद निष्फळ आहे. सरकार, चंद्रानें समुद्राला आपल्याकडे कितीहि प्रेमानें ओढलें तरी सागराच्या तळाशीं चाललेल्या खळबळीचा त्याला कांहींहि पत्ता लागत नाहीं. आपलीहि स्थिति तशीच आहे. या दारू-च्या पायीं दररोज किती पोरें भाकरीच्या तुकड्यासाठीं तळमळताहेत, या दारूच्या आगीनें किती आईबापांच्या आशांची राखरांगोळी केली आहे, या तांबड्या पाण्यामुळें स्वभावतः गंगाजलाप्रमाणें निर्मळ असणाऱ्या किती लोकांना काळें पाणी पहावें लागलें आहे."

"नेहमीं व्याख्यानें देण्याची संवय असल्यामुळें तुमचें बोलणें परिणाम-कारक होतें यांत संशय नाहीं. पण हा प्रश्न काव्यांतल्या कल्पनांनीं सुटणार नाहीं. राज्यकारभाराला लागणारे पैसे झाडाला लागत नाहींत कांहीं !"

"प्रजेच्या प्राणापेक्षां पैशाची किंमत कधींच अधिक नसते."

" हा उपदेश तुम्ही नको करायला मला. तीन वर्षांतला माझा राज्य-कारभारच काय तें लोकांना सांगेल. तुम्ही खुशाल वाटेल तितकी टीका करा. संस्थानच्या सर्वांगिण प्रगतीसाठींच मला दारूबंदीचा कायदा करतां येत नाहीं. "

हुजऱ्या फोटोग्राफरला घेऊन आल्यामुळें श्रीमंत व संपादक यांची ही संवादात्मक रस्सीखेंच इथेंच थांबली. श्रीमंतांनीं सर्व फोटो हातांत घेतले व मोठ्या उत्कंठेनें ते पहायला सुरुवात केली. मधलाच एक फोटो संपादकांपुढें करून ते म्हणाले, " हा पाहिलात का फोटो ? आमच्या मारुती ड्रायव्हरच्या मुलाचा आहे हा ! शिशुसप्ताहांत सात वर्षांच्या मुलांना ठेविलेल्या दोन बक्षिसांपैकीं पहिलें त्यानें पटकावलें व दुसरें युवराजांना मिळालें." संपादकांनीं तो फोटो हातांत घेतला. एखाद्या पूर्ण फुललेल्या गुलाबाप्रमाणें दिसणारी ती छबी पाहून त्यांना आनंद झाला. पण दुसऱ्याच क्षणीं त्यांनीं एक दुःखाचा सुस्कारा सोडला. तो अर्थपूर्ण सुस्कारा श्रीमंतानाहि ऐकूं गेला. " वाईट कसलें वाटलें तुम्हाला ? कसा दगडासारखा मुलगा आहे, नाहीं ? "

" वाईट एवढ्यासाठींच वाटलें कीं या दगडांतून देव निर्माण न होतां दारूबाज बापामुळें या दगडाची माती होऊन जाईल. "

" आली तुमची कथा मूळपदावर. शिशुसप्ताहांत बक्षिसें मिळविणारीं मुलेंच मोठेपणीं विजय मिळवितील. "

श्रीमंतांचा शेवटचा शब्द कुणाच्याशा हास्यांत संपादकांना अस्पष्टच ऐकूं आला. त्यांनीं दरवाजाकडे वळून पाहिलें तों दोन मुलें धांवतच दिवाण-खान्यांत येत होतीं. त्या मुलांच्या मागोमाग मारुती आला व त्यांतील काळ-सर मुलाच्या दंडाला धरून म्हणाला, " किती रे अवखळ आहेस, जया ! समोर महाराज बसले आहेत ना ? "

श्रीमंत हंसून म्हणाले, " देवाप्रमाणें लहान मुलांना राजा व रंक दोन्ही सारखेच ! सोड तूं त्याचा दंड. "

मारुतीनें दंड सोडतांच 'कशी झाली बाबाची' म्हणून जया टाळ्या पिटूं लागला. त्याच्या या बेडरपणाचें श्रीमंतांना मोठें कौतुक वाटलें. त्यांनीं त्याला जवळ बोलावून त्याच्या पाठीवरून हात फिरविला. चांदण्यानें पृथ्वी जशी मुग्ध होऊन जाते, त्याप्रमाणें प्रेमस्पर्शानें जीव तत्काळ वश होतो.

जया खुल्या दिलानें श्रीमंतांबरोबर बोलूं लागला. ' राणीसाहेबांकडे आलास का जाऊन ? ' या प्रश्नाचें उत्तर नुसतें ' होय ' असें न देतां त्यानें लांब-लचक वर्णनाला सुरुवात केली, " राणीसाहेबांनीं किनई आईला कसलें छान छान लुगडें दिलें आहे म्हणतां ! मलासुद्धां जरीची टोपी दिली. त्या दिवशीं माझा नंबर विजय महाराजांच्या वर होता ना हो ? मग मला त्यांच्यासारखा मऊमऊ कोट कां हो नाहीं ? "

" देऊं या हं करून," राजेसाहेबांनीं उत्तर दिलें. " मात्र तूं दररोज विजया-बरोबर खेळायला येत जा ! "

" ते नाहीं वाटतें आमच्या घरीं येणार ? "

" येईल हं तुझ्या घरीं तो कधीं तरी. बरें मारुती, आतां पुलाकडे परत जाऊन यायला आठ तरी होतील, नाहीं ? "

" होय सरकार ! " मारुती खिन्न स्वरानें म्हणाला. त्याची नाखुषी त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दृग्गोचर होत होती. त्याची अनिच्छा लक्षांत घेऊन श्रीमंत म्हणाले, " तूं जयाला घेऊन घरीं जा. मी दुसऱ्या ड्रायव्हरला घेऊन जाईन."

श्रीमंतांनीं जयाचा गालगुच्चा घेतला, जयानें विजयच्या कानांत कांहीं गुपित सांगितलें व नंतर मारुती त्याचें बोट धरून त्याला बाहेर घेऊन गेला. लगेच श्रीमंत संपादकांकडे वळून म्हणाले, ' मी प्रजेशीं असा वागतों आहें. जयांत व विजयांत मी कांहीं भेद केला का ? त्या मारुतीला किती गोडीगुलाबीनें घरीं जाण्याची परवानगी दिली तें तुम्ही पाहिलंतच ! लोकांचें बरें व्हावें असें मलाहि वाटतें. पण दारुबंदी करणें हा कांहीं त्याचा उपाय नव्हे ! चला हवें तर माझ्याबरोबर नव्या पुलाचें काम बघायला ! लोकांच्या कल्याणाचेंच आहे तें !"

पुलाचें काम पाहून परत यायला नऊ वाजून गेले. विजय जेवून केव्हांच झोंपीं गेला होता. राणीसाहेब चिंतातुर होऊन श्रीमंतांची वाट पहात होत्या. मोटारीला अपघात विपघात तर झाला नसेल ना, ही शंका त्यांचें हृदय व्याकुळ करून सोडीत होती. या शंकेबरोबरच परत येणें झाल्यावर थोडेंसें रागाचें नाटक दाखवायचें व अपरात्रीं कामाला न जाण्याचें वचन घ्यायचें असा गोड विचारहि सरीमागोमाग येणाऱ्या उन्हाप्रमाणें त्यांचें मन प्रका-शित करून टाकीत होता. शेवटीं एकदांचें मोटारीचें शिंग वाजलें. श्रीमंतांची

स्वारी दिसतांच रागावण्याचा विचार कुठच्या कुठं दडून गेला व राणीसाहेबांच्या चेहऱ्यावर आनंददर्शक स्मित खेळूं लागलें.

कपडे काढून ठेवून हुजऱ्या बाहेर गेल्यावर श्रीमंत म्हणाले, " राजाची राणी होण्यापेक्षां त्या मानत्याची बायको होणें बरें असें तुला वाटत असेल, नाहीं ? कधीं सातांच्या पलीकडे वाड्यांत रहावयाला तयार नाहीं तो. आम्हीं मात्र राजे होऊन नऊनऊ वाजवितों घरीं यायला ! "

" राजवाड्यापेक्षा झोंपडी बरी असें वाटतें खरें अशा वेळेला. पण संध्याकाळीं मारुतीच्या बायकोला पाहिल्यापासून झोंपडींत राजवाड्याच्या दुप्पट दुःख असतें, असें वाटूं लागलें आहे ! "

" तिला दुःखी असायचें काय कारण बुवा ? चांगला तीस रुपये पगार मिळतो नवऱ्याला ! पोरगा म्हणजे नुसतें रत्न आहे रत्न ! "

" पण तीस रुपयांपैकीं तिच्या पोटाला एक पै मिळत असेल तर ना ? तो मारुती मेला दारूबाज आहे कीं काय, कोणाला ठाऊक ! "

" दारूबाज ! कशावरून ? " श्रीमंत एकदम चमकून म्हणाले. आपल्या सहवासांतील इसम दारूबाज आहे ही कल्पनाच त्यांना विलक्षण वाटली.

" मी तिला नवें लुगडें दिलें व पुन्हां येशील तेव्हां हें नेसून ये म्हणून सांगितलें. तेव्हां ' तिथपर्यंत घरांत राहिलें तर ! ' असें कायसें ती म्हणाली. शिवाय तिच्या तोंडावर कळा कशी ती नाहीं. "

" अस्सें ! " राजेसाहेब कांहीं तरी बोलायचें म्हणून बोलले. नेहमीं बारा तास आपल्या निकट सहवासांत रहाणारा मारुती दारूबाज असावा याचें त्यांना आश्चर्य वाटत होतें. पण दिव्याखालींच जगांत अंधेर वावरत असतो !

" त्या जयानेंहि विजयाला कांहींतरी सांगितलें असावें. ' जयाचे बाबा त्याच्या आईला कां ग मारतात ? ' असें विजय मला मघाशीं विचारीत होता. "

श्रीमंतांनीं राणीसाहेबांच्या बोलण्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. मारुतीसारख्या सर्व दृष्टींनीं सुखांत असणाऱ्या मनुष्यानें दारू कां प्यावी हेंच त्यांना कळत नव्हतें.

सकाळीं चहापान झाल्यावर गांवाच्या कुठल्या तरी भागांतून एकट्यानेंच मोटारींतून चक्कर मारून जायचें असा श्रीमंतांचा शिरस्ता होता. सूर्यवंशी लोकांना लवकर उठण्याचा धडा देणें, मराठी शाळेंतल्या मास्तरांना भाजी

वगैरे घेऊन नंतर शाळेंत जाण्याचा मोह उत्पन्न न होऊं देणें, सकाळची उत्साहवर्धक हवा खाणें वगैरे अनेक कामें या चक्करीमुळें साधत असत. आज विजयानें बरोबर येण्याचा हट्ट धरल्यामुळें त्याला घेऊन श्रीमंत फेर-फटक्याला बाहेर पडले. दहा मिनिटांत त्यांनीं गांव मागें टाकलें. विजय कुतूहलानें रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पहात होता. तो एकदम ओरडला, ' जया! आप्पासाहेब, जया. ' श्रीमंतांनीं मोटार थांबविली व खालीं उतरून पाहिलें, तों रस्त्याच्या कडेला जया बसला होता.

" इकडे कुणीकडे रे तूं? "

" डोंगरावर शिरपुटें गोळा करायला गेली आहे आई! " महिना तीस रुपये मिळविणाऱ्या मारुतीच्या बायकोला सकाळीं उठल्याबरोबर मैल दोन मैलांवर स्वयंपाकाकरितां काटक्या गोळा कराव्या लागतात, याचा अर्थ काय असा प्रश्न श्रीमंताच्या मनांत उभा राहिला. लगेच त्याचें ' दारू ' हें उत्तर त्यांना दिसूं लागलें. एवढ्या वेळांत विजयहि उतरून जयापाशीं आला होता. जयाचा हात हातांत घेऊन खेळतां खेळतां तो म्हणाला,

" जया, तुला ताप आलाय् का रे? " श्रीमंतांनीं जयाच्या अंगाला हात लावून पाहिला. पोर तापानें फणफणत होतें.

" कशानें रे आला हा ताप? "

" लागलेंय इथें, " असें म्हणून जयानें उजवीकडे मान वळविली. डोक्याच्या मागच्या बाजूला चांगलीच खोक पडली होती.

" कुठें रे पडलास?" श्रीमंतांनीं विचारलें.

" परसांतल्या विहिरीजवळ. "

" आपोआपच पडलास? "

" आई म्हणाली आहे सांगूं नकोस कोणाला म्हणून. "

" सांग तूं मला. आई कांहीं रागावणार नाहीं तुझ्यावर. "

" काल राणीसाहेबांनीं दिलेली जरीची टोपी रात्रीं बाबा मागायला लागला. मी नाहीं म्हटलें तेव्हां मारायला लागला. टोपी घेऊन मी पळालों परसांत. पण विहिरीपाशीं मला ढकलून देऊन टोपी काढून घेतलीन त्यानें." सांगतां सांगतां जयाच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. पडलेल्या खोकेपेक्षां जरीची टोपी गेल्याचेंच दुःख त्याला जास्ती होत होतें. श्रीमंतांनीं डोंगराकडे

पाहिलें. एक फाटकें लुगडें नेसलेली बाई डोक्यावर काटक्यांचा भारा घेऊन डोंगर उतरत होती ! जयाच्या जरीच्या टोपीप्रमाणें तिचें लुगडेंहि कला-लाच्या भक्ष्यस्थानीं पडलें असावें अशी त्याची खात्री झाली. आपण इथें राहिल्यास तिला अधिकच वाईट वाटेल म्हणून ते विजयासह मोटारीकडे परत आले व बरोबर आलेल्या हुजऱ्याला म्हणाले, “ तूं रहा इथेंच उभा. मोटारींत कुणी नसलें तरी चालेल मला ! ती मारुतीची बायको डोंगर उतरून आली कीं तिला सांगून जयाला घेऊन दवाखान्यात जा, तिथें त्याची खोंक धुवून पट्टी बांधून घे आणि त्याला राजवाड्यांत घेऊन ये. ”

श्रीमंतांच्या हातात मोटारीचें व डोक्यांत दारूविषयीच्या विचारांचें चक्र फिरूं लागलें. सातानंतर मारुती वाड्यांत रहायला तयार कां नाहीं याचें कारण त्यांना आतां समजलें. साताला त्याला मदिरादेवीच्या सेवेला सादर व्हावयाचें असतें. मारुती म्हणजे एरवीं किती सालस माणूस. पण दारूनें देवाचा राक्षस होतो, हेंच खरें. नोकरीवरून काढून टाकण्याची भीति घालून त्याचें व्यसन कमी झालें तर पहावें असें त्यांनीं विचारांतीं मनाशीं ठरविलें. मोटार यावेळीं राजवाड्याकडे जाणाऱ्या छोट्या वांकदार रस्त्यापाशीं आली होती. तिथें पुलाच्या कामाच्या मक्तेदारांनीं आपल्याला नमस्कार केला असें वाटल्यावरून श्रीमंतांनीं मोटार थांबविली. मक्तेदारांना कामासंबंधीं कांहीं बोलायचें होतें. आपण मोटारींत बसून मक्तेदारांना रस्त्यांत उभें करणें आपल्या समतेच्या बाण्याविरुद्ध होईल असें वाटून श्रीमंत मोटारींतून उतरले व त्यांच्याशीं बोलूं लागले.

मोटार दूर कां उभी राहिली, हें पहाण्यासाठीं मारुती वाड्यांतून बाहेर आला. तो बाहेर आला त्याच वेळीं मोटार एकदम सुरू झाली. श्रीमंत बाहेर जाऊन बोलत उभे राहिलेले पाहून विजय बालस्वभावाला अनुसरून मोटारीच्या चाकापाशीं खेळूं लागला होता. मोटार सुरू कशी करतात हें त्यानें पाहिलें होतें. त्यानें लगेच प्रयोग केला व दुर्दैवानें तो यशस्वीहि झाला. मोटार सुरू झाली, श्रीमंत घाबरून तिच्यामागून धांवूं लागले. वाड्याच्या मोठ्या दरवाजाकडे जायला एक मोठें वळण होतें, त्या ठिकाणीं मोटार फिरविली नाहीं तर ती समोरच्या दगडी भिंतीवर जाऊन आपटणार हें उघड दिसत होतें. श्रीमंतांनीं धांवण्याची शिकस्त केली; नुसती मोटार

गांठून कांहीं फायदा नव्हता हें खरें, पण तेंहि त्यांना अशक्य झालें. आलें; वळण आलें. श्रीमंतांच्या डोळ्यांपुढें अंधारी आली. पण इतक्यांत समोरून कुणी तरी वायुवेगानें मोटारीच्या चाकाच्या बाजूला उडी मारून ती बरोबर वळविली. त्या दिवशीं द्रोणागिरी पर्वत आणून लक्ष्मणाला प्राणदान करणाऱ्या मारुतीपेक्षां श्रीमंतांना व राणीसाहेबांना आपला मारुती मोठा वाटला.

मारुतीनें धांवत्या मोटारींत उडी मारण्याचें धाडस करून युवराजांचे प्राण वाचविले. त्याच्या या स्वामिभक्तिपुढें दारूचें व्यसन म्हणजे क:पदार्थ आहे असें श्रीमंतांना वाटूं लागलें. सूर्याच्या प्रकाशाकडे पहात असतांना त्याच्यावरही डाग आहेत, हे शास्त्रीय ज्ञान कोठल्या कोठें नाहींसें होतें हा नित्याचा अनुभव आहे. युवराजांचे प्राण वांचविल्यामुळें बडतर्फीऐवजीं बढतीच मारुतीच्या पदरांत पडली. मारुतीच्या दारूदुकानदाराला अत्यंत आनंद झाला.

बरेच दिवस झाले तरी जया राजवाड्याकडे फिरकला नाहीं. विजय वरचेवर त्याची आठवण काढी व मारुती तो आजारी आहे असें सांगे. गणेशचतुर्थीचे दिवशीं पुलाचा उद्घाटन समारंभ व्हावयाचा असल्यामुळें श्रीमंतांची स्वारी रात्रंदिवस त्याच कामांत गुंतलेली असे. खुद्द गणेशचतुर्थीच्या दिवशींहि राजवाड्यांतील गणपति पाहण्याकरतां जया आला नाहीं असें पाहून पुलाकडे जातांना श्रीमंत मारुतीला म्हणाले, " काय रे, जया दिसला नाहीं हल्लीं कुठें तो ? "

" तापानें बेमार आहे, सरकार ! "

" कशानें रे ताप येतोय् ? "

" ती मागची खोंक बरी व्हायच्या आधींच डोकें फोडून घेतलें पोरानें ! "

" त्यानें फोडून घेतलें कीं दुसऱ्या कुणी फोडलें ? "

मारुतीनें एकदम दचकून श्रीमंतांच्याकडे पाहिलें.

आपल्या खासगी गोष्टी कुणीतरी श्रीमंतांना कळविल्या असें वाटून त्याच्या अंगाचा भडका उडाला. कळविणार कोण ? एक बायको नाहीं तर मुलगा !

" जयाचें औषधपाणी नीट करतोस ना ? "

" होय सरकार; पण पोरानें फार दिवसांपासून एक हट्ट धरला आहे. "

" सांग ना कोणता तो. हट्ट पोरांचेच पुरवायचे असतात; थोरांचे नाहींत

" धाकट्या सरकारांना कधीं एकदां पाहीन असें झालें आहे त्याला."

" पुलाचा समारंभ झाला कीं जा ना विजयाला तुझ्या घरीं घेऊन. लवकर आणून पोंचता कर म्हणजे झालें ! " श्रीमंत जवळ बसलेल्या युवराजांकडे पहात म्हणाले, " मग मारुतीबरोबर त्याच्या घरीं जा आणि त्याला भेटून ये हं. चतुर्थीचा खाऊ म्हणून त्याला हे दहा रुपये दे ! " श्रीमंतांनीं एक दहा रुपयांची नोट विजयाच्या हातांत ठेवली.

पूल सुरू करण्याचा समारंभ यशस्वी रीतीनें पार पडला. श्रीमंतांनीं मोठें मार्मिक व प्रेमळ भाषण केलें, ' प्रत्येक मनुष्यानें आपलें आयुष्य पुला-सारखें उपयुक्त केलें पाहिजे. श्रीमंत–गरीब, स्पृश्य–अस्पृश्य, सुशिक्षित–अशिक्षित, ऋणको–धनको, स्त्री-पुरुष हे सर्व आपल्या समाजांत तुटून वागतात व लहानशा कारणासाठीं त्यांतील दुर्बळ अबलांवर तुटून पडतात. प्रेमाच्या पुलानें हे समाजाचे विभक्त वाटणारे भाग जोडले तरच आपणाला खरें सुख मिळेल, ' ह्या त्यांच्या भाषणाच्या समारोपाला तर हस्तनक्षत्राच्या मेघगर्जनेला लाजविणाऱ्या टाळयांचा कडकडाट झाला. भाषण संपवितां संपवितां त्यांची नजर समोरच बसून भाषण टिपून घेत असलेल्या प्रजा-सेवकाच्या संपादकांकडे गेली. जातां जातां त्यांना टोमणा मारण्याचा मोह श्रीमंतांना आवरला नाहीं. अस्फुट स्मित करीत ते म्हणाले, ' दारूबंदीचा कायदा करायला मी तयार नसल्यामुळें प्रजेचें खरें कल्याण मला कळत नाहीं असें कित्येक लोकांचें म्हणणें आहे. त्यांच्या या आक्षेपाला हा भव्य पूलच परस्पर उत्तर देईल. खालीं वाहणाऱ्या भयंकर नदीची भीति जशी या पुलानें नाहींशी केली आहे, त्याप्रमाणें सार्वत्रिक शिक्षणाचा पूल बांधून दारूच्या नदीपासून होणारे अनर्थ थांबविण्याच्या प्रयत्नाला मी कधींच लागलों आहें. अशा रीतीनें दारूशीं लढण्यांत माझा पूर्ण विजय होईल अशी माझी खात्री आहे.'

टाळया, गोंगाट, हारतुरे, पानसुपारी वगैरे गोष्टी यथाक्रम होऊन समा-रंभ संपला. श्रीमंतांना वाड्यांत पोंचवून युवराज व त्यांचा हुजऱ्या यांच्या-सह मारुती आपल्या घरीं जावयाला निघाला. जातांना राणीसाहेब मारुतीला बजावून म्हणाल्या, ' मारुती, संभाळ हं विजयाला, त्याला मोटारीच्या चाकाला हात लावूं देऊं नकोस मुळीं. त्या दिवशीं तूं होतास म्हणून माझें

बाळ—' त्यांना पुढें बोलवेना. त्या पदरानें डोळे पुसून क्षणोक्षणीं लहान होत जाणाऱ्या मोटारीकडे पहात उभ्या राहिल्या.

जयाच्या खोलींत विजयानें पाऊल टाकलें तों प्रथम त्याला कांहीं दिसेनाच. त्यानें प्रेमभरानें हांक मारली, ' जया. ' क्षीण आवाजांत उत्तर आलें ' ओ. ' उत्तराच्या दिशेनें विजयानें पाऊल टाकलें. एका लहान झरोक्यापाशीं एकदोन फाटक्या कांबळ्यावर गोधडी अंथरून त्यावर जयाला निजविलें होतें. ' बाबा ' जया कण्हत म्हणाला, ' आई भांडीं घांसायला गेली आहे तिला बोलवा ना, म्हणजे ती चहा देईल ! ' मारुतीनें अश्रुपूर्ण नेत्रांनीं जया–विजयाच्या जोडीकडे पाहिलें व ' सरकार, बसा इथंच हं, ' असें म्हणून तो खोलीबाहेर पडला.

तो कुठेंतरी बाहेर जात आहे असें पाहून मोटारींत बसलेला हुजऱ्या म्हणाला,

" काय राव कुठें चालली स्वारी ? "

" घरकरणीला बोलावून आणायला. "

" कितीसें लांब जायचेंय् ? वाटेवर कांहीं दुकानबिकान आहे कीं नाहीं ?"

" वाटेवर दुकान आहे; पण पै देखील नाहीं बाबा माझ्या खिशांत. "

" नसेना ! आम्हीं तुमच्या घरीं आलों असलों तरी तुम्हीच आमचे पाव्हणे. चला राव, दोन पेले घेऊन जीव जरा आराम करूं या. "

मारुती व हुजऱ्या निघून गेले. आंत विजय व जया यांच्या गोष्टी अगदीं रंगांत आल्या होत्या. काळेंकुट्ट आकाश विजेच्या चमकीनें क्षणभर निवळावें त्याप्रमाणें विजयाच्या प्रेमानें जयाची निस्तेज झालेली जीवनज्योति चमकूं लागली होती. आठ नऊ महिने तुंबवून ठेवलेलें पाणी मृगारंभीं मुसळधारांनीं पृथ्वीवर वर्षणाऱ्या आकाशाप्रमाणें तो आपल्या आजारांतल्या साऱ्या गोष्टी विजयाला सांगत होता. त्याची पहिली खोंक बरी होत आली होती. पण एके दिवशीं मारुती बायकोला मारूं लागला हें पाहून, ' आईला मारूं नका हो बाबा ' असें म्हणत जया दोघांच्या मध्यें पडला. बेफाम धांवणारी मोटार आड येणाऱ्या मनुष्याची पर्वा करीत नाहीं. दारूच्या धुंदींत मारुतीचेंहि तसेंच झालें. त्यानें धाडकन् जयाला दूर लोटून दिलें. जया जात्यावर जाऊन पडला व पूर्वीच्या खोंकेच्या जागींच जोराचा घाव लागल्यामुळें पुन्हा

आजारी पडला. जखमेनें ताप येऊं लागला, तापानें अशक्तपणा आला व आतां तर त्याला अंथरुणावरून उठण्याची शक्ति देखील नव्हती.

" तूं आमच्या राजवाड्यातला गणपति पहायला येणार ना आज ? " विजयानें मोठ्या प्रेमानें त्याला विचारलें.

" यावेंसें वाटतें ! पण उठतां येत नाहीं. चतुर्थीच्या फटाकड्या उडवायला हात कसे शिवशिवताहेत ! पण काय करूं ? "

" होशील आतां तूं बरा हं. मी अप्पासाहेबांना सांगतों. म्हणजे ते मोठा डॉक्टर आणतील. "

" या खोलींत मला कसें कोंडल्यासारखें होतें. बरा असतांना परसांत जाऊन किती किती चांदण्या बघत होतों ! कसे खेळायला छान लोलक आहेत असें मला वाटे ! वाटोळा चंद्र पाहिला कीं मी आईला विचारी, ' आई, हा मोठा चेंडू घेऊन आभाळांत कोण ग खेळतें आहे ? ' ती म्हणे ' देव ' ! सकाळीं उठून आभाळाकडे पहात बसलें म्हणजे केवढी गंमत वाटे म्हणून सागूं ! तांबडी, सोनेरी नि निळी शाई कुणी तरी आभाळाच्या कागदावर सांडीत आहे असें दिसे नाहीं ? किती दिवस झाले. यांतलें कांहीं देखील बघायला मिळालें नाहीं बघ. "

" तूं बरा झालास किनई म्हणजे आपण दोघे हें सगळें बघूं या. "

" आज तर कसे अगदीं चुकल्याचुकल्यासारखें होतेंय. या झरोक्याबाहेरच एक गुलाबाचें झाड होतें. दररोज त्याचें एक तरी फूल फुले. त्या फुलाकडें पाहिलें म्हणजे देवबापाच मला राखण्यासाठीं तिथें येऊन राहिला आहे असें वाटे. पण आज त्याचे फूल मुळीं फुललेंच नाहीं, नि त्यामुळें मला किती भीति वाटते आहे ! "

" जया, तूं एवढा सशक्त. माझ्या वर नंबर मिळविलास शर्तींत. असं उगीच भ्यावें का आपण ? "

" मला किनई कुणी तरी आईजवळून हिसकावून नेत आहे असें वाटतें ! आभाळ काळेंकुट्ट झालें कीं बागुलबोवाच मला न्यायला आला असें वाटून माझी घाबरगुंडी उडते बघा. रात्र झाली कीं माझ्या छातींत कसेंसेंच होतें. छपरावर पाऊस सपसप पडूं लागला कीं मला मारायलाच कुणी आलें असें वाटायला लागतें. " हें बोलतांबोलताच जया विजयाला बिलगला. त्याच्या

गळ्यांत हात घालून विजय म्हणाला, " तूं अगदीं भिऊं नकोस हं. हे आप्पासाहेबांनीं दहा रुपये तुला खाऊला दिले आहेत. " विजयानें जयाच्या हातावर नोट ठेवली. सद्गदित स्वरानें जया म्हणाला, " तुम्ही माझ्यावर किती माया करितां ! पण माझी भीति कांहीं केल्या जात नाहीं. त्याला मी काय करूं ! वारा घों घों करूं लागला कीं कुणी तरी ' चल, जया चल ' असें दरडावून ओरडत आहे असें मला वाटूं लागतें. "

" आपण आपलीं नांवेंच बदलूं या, म्हणजे झालें. मला कांहीं तुझ्यासारखी भीति वाटत नाहीं न् आमच्या वाड्यांत मला न्यायला कुणी येणारहि नाहीं. तेव्हां तूं हो विजय नि मी होतों जया. ' चल, जया चल ' असें कुणी तुला म्हटलें तर तूं त्याला खुशाल सांग, ' माझें नांव आहे विजय, जया नव्हे मी. ' " विजयाच्या या युक्तीनें जयाला बरेंच समाधान झालें. तो आनंदानें म्हणाला, " खरेंच ! छान आहे युक्ति ही. आतांपासूनच आपण नांवें बदलूं या. "

' विजय ' विजयानें हाक मारली. ' ओ ' जयानें उत्तर दिलें. ' जया ' जयानें हाक मारली. ' ओ ' विजयानें उत्तर दिलें. जयानें प्रेमभरानें विजयाला मिठी मारली. या प्रेमसमाधींत तीं दोन बालकें संगमांतल्या नद्यांप्रमाणें दिसत होतीं.

त्यांच्या या प्रेमसमाधीचा भंग कुणाच्याशा धडपडीनें झाला. खोलींत कोणी तरी आलें होतें. आपल्यालाच न्यायला कोणी तरी आलें असेल असें वाटून जया विजयाला घट्ट चिकटला.

' जया, पैसे दे, ' एखाद्या गुहेंतून यावा त्याप्रमाणें आवाज आला. तो मारुती असावा असें विजयाला वाटलें, पण खात्री होईना. कुणीतरी अंथरुणाशीं आलें व खसकन् हात धरून विजयाला ओढलें. ' बोल, नांव काय तुझें ? ' जयाशीं केलेली नांवाची अदलाबदल विजय विसरला नव्हता. तो धिटाईनें म्हणाला,

" माझें नांव जया. "

" टाक तर पैसे. टाक दहा रुपये. काय ? नाहीं टाकत ? मी दहा रुपयांची पिणार. मी शंभर रुपयांची पिणार. तुझ्या बापाचें काय जातें त्यांत ? " खांदा धरून बेफाम मारुतीनें विजयाला गदगदां हालविलें. तो त्याच्या

अंगावर पैसे चाचपूं लागला. पण ते कुठेंच मिळेनात; घाबरून गेल्यामुळें विजयाच्याहि तोंडून शब्द फुटेना. " नाहीं ना देत पैसे तूं ! काय करायचेंय् असलें कारटें !"

मारुतीनें विजयाची मोटली उचलली व तो एकदम परसांत धांवत गेला. जया तर भीतीनें अर्धवट बेशुद्धच झाला होता. आपल्याजवळून विजयाला कुणी तरी उचलून नेलें एवढें त्याला कळलें. त्यानें ओरडण्याचा प्रयत्न केला; पण त्याच्या तोंडांतून शब्दच बाहेर फुटेना. याच वेळीं जयाची आई भांडीं घांसून परत आली व त्याच्या खोलीच्या दारांत येऊन 'जया, राजा रे, सोन्या रे,' असा साद घालूं लागली. जयाची 'आई' ही अस्पष्ट हांक व परसांतल्या विहिरींतील धाड् असा आवाज एकदमच तिच्या कानांवर पडला.

* * *

विजयाचें प्रेत पाहतांच जयानें त्याला घट्ट मिठी मारली व जे डोळे मिटले ते पुन्हां उघडलेच नाहींत ! मारुतीला पोलिसांच्या ताब्यांत दिला होता. कोणी तरी गोळी घालून तत्काळ आपल्याला दुःखमुक्त कां करीत नाहीं असें त्याला वाटत होतें. श्रीमंत समोर आले तेव्हां तर तो एखाद्या लहान मुलाप्रमाणें ढळढळां रडत जमिनीवर धडधड डोकें आपटून घेऊं लागला. युवराजांच्या शवाला अग्नि देण्यापूर्वी श्रीमंतांच्या आज्ञेवरून कारभाऱ्यांनीं दारूबंदीचा जाहीरनामा वाचून दाखविला.

दोन्ही बालकांच्या चिता पेटल्या. अग्नीच्या ज्वाळा जीभ बाहेर काढून 'विजय कोणाचा ?' म्हणून प्रश्न विचारूं लागल्या. लोकांनीं उत्तर दिलें 'दारूबंदीचा !' त्या उत्तरानें ज्वाळांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं श्रीमंत उभे होते तिकडे वळून पुन्हां प्रश्न केला, 'विजय कोणाचा ?' श्रीमंतांनीं वर पाहिलें व छाती घट्ट धरून ते ओक्साबोक्शीं रडूं लागले. त्यांचा विजय आतां अग्निज्वाळांचा झाला होता !

# कवीचें लग्न ५

## १

खिसेकापूप्रमाणें कवीहि जन्मावाच लागतो अशी इंग्रजींत म्हण आहे. ही म्हण खरी असल्यास आमच्या भाईनीं एका जन्मात दोनदां जन्माला येण्याची कर्तबगारी करून दाखविली होती असें निर्विवाद म्हणतां येईल. याचा अर्थ त्यांचे हात दिवसा खिसे कापण्यांत व रात्रीं काव्यें लिहिण्यांत गुंतलेले असत असा मात्र नाहीं ! त्यांना काव्याची स्फूर्ति झाली कीं मंथरेला झपाटणाऱ्या कलीप्रमाणें त्यांच्या अंतर्यामीं दडून बसलेली खिसेकापूपणाची प्रवृत्ति एकदम उचल खाई व वेदापासून शुद्धिसंघटनेच्या पदांपर्यंत सर्व काव्यें ते चाळूं लागत. ‘ बालादपि सुभाषितं ग्राह्यम् ’ या न्यायानें केवढेंहि लहान काव्य असलें तरी त्यातून एकादा चरण किमानपक्ष एकादा शब्द घ्यावयाला ते कधींहि कमी करीत नसत. खिसेकापू जिवंत मनुष्याच्याच चोऱ्या करतो; पण आमच्या भाईंची स्फूर्ति दोन हजार वर्षांपूर्वी मेलेल्या माणसाला देखील सहजासहजीं लुबाडीत असे. रामायण रचणारा खुनी वाल्या कोळी, दहीं–दूध चोरून खाणारा कृष्ण गवळी, वगैरे पुरातन कवींपासून अर्वाचीन नेलीतांबोळ्यापर्यंत सर्वांच्या काव्यांवर भाई हल्ला चढवीत व बहुधा लूट घेऊन परत येत असत. प्रत्येक कवि हा चोर असलाच पाहिजे अशी जवळ जवळ त्यांची ठाम समजूत झाल्यामुळें कविसंमेलनें तुरुंगांत भरवावींत असेंहि त्याना मधून मधून वाटे.

पण कवि व तुरुंग यांचा भाईनीं आपल्या मनानें कितीहि निकट संबंध जोडला असला तरी ते स्वतः कवि असूनहि अद्याप चतुर्भुज झाले नव्हते. ऋतुमानाप्रमाणें हवा, फळें, भाज्या, माणसाचे कपडे, फार काय, काव्यदेखील बदलतें असें त्यांचें अलीकडेच मत होत चाललें होतें. त्यांच्या काव्यलेखनाला प्रारंभ गणपति व सरस्वती यांच्या वंदनापासून झाला होता. लग्नदिवशींच बायकोच्या हाताबरोबर जो काव्यसंग्रह आपल्या हातांत पडावा अशी त्यांची इच्छा होती त्यांतील पहिली कविता ‘ श्रीगणेशाय नमः ’ हीच होती. या

कवितेंत गणपतीला त्यांनीं महाकवि म्हटलें असून त्याच्या काव्यस्फूर्तीचें कारण त्याच्या अष्ट नायिकाच होत, असें रसाळपणानें वर्णन केलें आहे. गणपतीच्या सोंडेसंबंधाची त्यांची कल्पना तर वत्सलरसपरिपूर्ण होती. भगवान् महादेवाच्या अंगावर हजारों सर्प असतात हें प्रत्येक हिंदूला माहीत आहेच. एकदां महादेवांनीं मोठया प्रेमानें आपल्या धाकट्या मुलाचा म्हणजे गणपतीचा मुका घेतला. महादेवाचें हें प्रेम पाहून त्यांच्या अंगावरल्या एका सर्पराजालाही ही स्फूर्ति झाली. तो जो गणपतीच्या तोंडाला जाऊन चिकटला तो तिथेंच राहिला, ( या कल्पनेवरूनच सुचलेलें ‘ गुळाचा गणपति ’ या नांवाचें महाकाव्य भाई लिहिणार होते आणि गुळाच्या अडत्यांनीं त्या काव्यांत घालण्याकरितां आपल्या जाहिराती देखील पाठविल्या होत्या !) अशा रीतीनें गणपतीची सोंड म्हणजे त्याच्या तोंडाला चिकटलेला सर्पच आहे, असें भाईना वाटलें. भाई फारसे नव्या मताचे नसल्यामुळें त्यांनीं सरस्वतीवर गणपतीनंतरच कविता लिहिली. नवरा उंदरावर असतांना आपण मोरावर बसून नाचणें बायकांच्या जातीला शोभत नाहीं असा उपदेशहि त्यांनीं सदरहु कवितेंत सरस्वतीला केला आहे ! बरोबरच आहे ! कवि हा निःस्पृह असावयाचाच ! तो असल्या देवदेवतांना भीक थोडीच घालणार आहे ! ( भीक घातली नाहीं तरी मागावयाला तो मुळींच कचरत नाहीं. भाईनींहि याच कवितेच्या शेवटीं ‘ तुझा कंठमणि होण्याचें भाग्य नसलें तरी तुझ्या पायांतलि नुपूर तरी कर, तुझ्या पायधुळींत लोळून मला कविमल्ल होऊं दे ’ वगैरे अर्जदाराला शोभणाऱ्या विनंत्या केल्या होत्याच !)

अशा रीतीनें सर्व देवांची भाई क्रमवारीनें हजेरी घेत राहिले असते, तर त्यांच्या तेहतीस कोटी कविता होईपर्यंत तरी इतर विषय सुरक्षित राहिले असते ! पण या कलियुगांत तें घडून यावें कसें ? भाईचा देवांवरील विश्वास लवकरच उडाला व ते पूजेकरितां फुलें धुंडाळणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणें कधीं कमळ, चांफा, गुलाब वगैरे फुलांकडे, तर कधीं लांकडें गोळा करायला जाणाऱ्या लोकांप्रमाणें रानांकडे धांव घेऊं लागले. पण त्यांचें हें वनवासाचें वेडहि फार दिवस टिकलें नाहीं. भाई एकदम देशभक्त बनले व विलायती कपड्याच्या गाद्यांवर लोळत लोळत खादीवर काव्यें करूं लागले. जानेवारींत निघून फेब्रुवारींत बंद पडणाऱ्या मासिकांत हीं काव्यें छापून आल्यामुळें

तर भाईंचा आनंद गगनांत मावेनासा झाला. छापून आलेली एक कविता पाहिली कीं, त्यांना मूठभर मांस चढे. बदाम-पिस्ते, सांजा-पुरी अगर कांदा-मूळ यांनीं जें काम साधलें नव्हतें तें एका कवितेनें फत्ते केलेलें पाहून भाईंच्या मातुश्रीहि आनंदित होऊं लागल्या. दर कवितेला मूठमूठभर मांस चढलें तर पांच पन्नास कविता छापून होतांच सुदामदेवासारखे दिसणारे भाई 'भीमदेवासारखे दिसूं लागतील, असें त्या प्रेमळ मातेला वाटूं लागलें. पण कुठल्याशा कवीनें म्हटलें आहे ना कीं, सुखामागून दुःख हें यावयाचेंच. क्षुधाशांतिगृहांतलि चमचमीत उपाहारानंतर येणाऱ्या दणदणीत बिलाप्रमाणें. भाईंच्या काव्यव्यायामांतहि एक विघ्न म्हणजे भाईंनी काव्यविषयाकरतां 'खादी' वरून जी उडी मारली ती एकदम 'प्रीति' वरच पडली हें होय!

प्रीति, प्रेम—केवळ दोन शब्द! पण हा दोन अक्षरी शब्द अक्षरशत्रूंना देखील मित्र करतो. मग भाईसारख्या मराठी, इंग्रजी वगैरे भाषांतलि अक्षरें येत असलेल्या मनुष्याची कथा काय? भाईंना गडकऱ्यांच्या कवितेखेरीज एकहि पुस्तक वाचवेना; तोंडांतून 'सजणे, राजसा' याशिवाय शब्द निघेनात. कावीळ झालेल्या मनुष्याला सर्व जग पिंवळें दिसतें त्याप्रमाणें त्यांना सर्व जग गुलाबी दिसूं लागलें. या आकस्मिक आलेल्या प्रेमरोगानें त्यांच्या अंगावर आलेलें सर्व मांस हिंवाळ्यांतल्या पानाप्रमाणें झडून गेलें. भाईंच्या काव्यस्फूर्तीनें 'श्रीगणेशाय नमः' सोडून 'हृदयदेवते' ची पूजा करायला प्रारंभ केला.

२

भाईंनीं रात्रभर जागावें व 'आडव्या रेघेस' उद्देशून एकादें काव्य तयार करावें असा कार्यक्रम सुरू झाला. ह्या अनामिक काव्यांत बहुधा 'तूं मला फुलें दिलींस. मागून येऊन माझे डोळे झांकलेस' इत्यादि इत्यादि गोष्टींचेंच वर्णन असे. भाईंच्या जानी दोस्तांना हीं काव्यें वाचून, भाई बहुतेक आपलें पूर्वजन्मांतील आत्मचरित्र लिहीत असावेत असा संशय येऊं लागला. पण या काव्यशून्य लोकांना भाई 'ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोनुधावति' या कोटींतील होते हें कुठें माहीत होतें? शेवटीं भाईंची हृदयदेवता त्यांच्या घराबाहेरच कुठें तरी असली

पाहिजे व आकाशांतील ग्रहांप्रमाणें तिचे भाईवर परिणाम होत असले पाहिजेत असें वाटून भाईच्या मातु:श्रींच्या सल्ल्याप्रमाणें त्यांच्या स्नेह्यांनीं वधूसंशोधनाला सुरुवात केली. भाईचें निराकार व निर्गुण प्रेम साकार व सगुण होऊं लागलें. आजपर्यंत आपलेच फोटो पहात बसणारे भाई आतां मुलींचे फोटो उत्सुकतेनें पाहूं लागले. भाईसारख्या व्यापक दृष्टीच्या कवींना संतांप्रमाणें आपपरभाव वाटणेंच शक्य नसतें. भाईची खोली म्हणजे एक पदार्थसंग्रहालयच होऊं लागलें. कारण भाईना आपली भावी वधू काव्याच्या कसोटीला उतरते कीं नाहीं हें पाहावयाचें होतें. कमळें, गुलाब वगैरे फुलें भाईच्या खोलीची वाट चालूं लागलेलीं पाहून आईना आनंदच झाला. त्यांना वाटलें, कीं मुलगा आतां कवितेचें वेड सोडून देवाची पूजा करावयाला लागणार! फुलानंतर शंखाची उचलबांगडी झाली. भाईचें उपास्यदैवत शंकर होणार असें आईना वाटलें! फोटोंतील मुलीचा गळा काव्यकोडांतल्या कलमानुरूप आहे कीं नाहीं हें त्याना कुठून कळणार? पण भाई पुढें भोंगे पकडावयाला लागलेला पाहून मात्र आईचा जीव खालींवर होऊं लागला. पण चतुर्भुज होण्याकरतांच भाई हीं भोंग्यांची तुकडी तयार करीत होते हें शिवलीलेंतला अकरावा अध्याय ऐकण्यापलीकडे जिच्या काव्याची गति गेली नव्हती त्या म्हातारीला कुठून समजणार? वधूच्या रूपाकरितां हे भिन्नभिन्न स्वरूपांतले कसोटीचे दगड जसजसे खोलींत जमा होऊं लागले तसतसे त्यांचे स्नेही मात्र त्यांच्या खोलींत पाऊल टाकावयाला भिऊं लागले. कटि व गति यांच्या परीक्षेसाठीं भाई सिंह व हत्तीहि बाळगावयाला कमी करणार नाहींत अशीहि कुजबुज त्यांच्या स्नेह्यांत सुरू झाली. आपल्या काव्यकसोटीनें आपल्या स्नेह्यांची किती दाणादाण उडवून दिली आहे याची कल्पनाच बापड्या भाईला नव्हती. (भाईचा एकवचनी उल्लेख होऊं लागलेला पाहून वाचकांना आश्चर्य वाटेल. पण तो भाईच्या 'न बहुवचनाला जागा कांहीं' या प्रेमाच्या ब्रीदाला धरूनच आहे!) परीक्षक प्रश्नपत्रिकेचा कागद डाव्या हातांत घेऊन उजव्या हातानें विद्यार्थ्यांच्या उत्तरांचे कागद जसे तपासत जातो त्याप्रमाणें डाव्या हातांत भृंग-कमळ—शंखांपैकीं एखादी वस्तु व उजव्या हातांत नवा परीक्षणार्थ आलेला फोटो घेऊन भाई भराभर वधूपरीक्षा करीत असे. अर्थात्, या काव्यपरीक्षेंत एकहि मुलगी उत्तीर्ण होऊं शकली नाहीं हें निराळें सांगायला नकोच.

३

भाई अशाच रीतीनें फोटो पाहात बसला तर उभ्या जन्मांत त्याचें लग्न होणें शक्य नाहीं हें सर्वांना कळून चुकलें. त्याच्या या वेडामुळें त्याच्या आईच्या खालोखाल जर कुणाला दुःख झालें असेल तर तें त्यांचे स्नेही भय्यासाहेब यांनाच होय. या दुःखाचें कारण भय्यासाहेबांची एक अविवाहित भाची होती एवढेंच होतें, असें मात्र मानण्याचें कारण नाहीं. भाईच्या खोलींतील फोटोंच्या सैन्यांत या भाचीचा फोटोहि सामील झाला होता. पण नाकाची चांफेकळी $\frac{1}{10}$ इंच अधिक विकासली आहे, नेत्रांच्या वर्तुळांचा परिघ अर्ध्या मिलिमिटरनें कमी आहे, इत्यादि कारणांसाठीं तो नामंजूर करण्यांत आला होता. भाईच्या कठिण कसोटीला एकहि मुलगी उतरत नाहीं असें पाहून भय्यासाहेब भाईला म्हणाले, " भाई, समुद्रांत बुडून तूं कोरडाच राहणार का रे ? "

कवि तात्काळ उत्तरले : " एखादी सुसर कांठावर घेऊन येण्यापेक्षां कोरडें राहिलेलें पुरवलें. मी समुद्रांत रत्नाकरितां बुडतों आहें. "

" पण ' रत्नं रत्नेन संगच्छते ' हें एका काव्यांतलें वाक्य मात्र तूं विसरतोस. "

" तें कसें काय, बाबा ? "

" तुला जशी आवडनावड आहे तशी मुलींनाहि नाही का ? तुला मात्र रत्न पाहिजे आणि त्या मुलीला मात्र—मी कशाला पुढें बोलूं बाबा ? "

" म्हणजे मुलीहि माझ्यासारख्याच काव्यप्रिय असतात का रे ? "

" काव्यप्रिय ? अरे, पुरुषांचें सगळें काव्यज्ञान उसनें असतें; पण बायका या जन्मतःच कवि असतात. निमिषार्धांत त्या असें दृश्यकाव्य निर्माण करतात कीं, पाहणारा मोहून जाऊन पुतळ्याप्रमाणें निश्चल होतो. "

" मग मला एखादी मुलगी पसंत पडली तरी तिला मी पसंत पडलोंच पाहिजे म्हणतोस ? "

" अलबत् ! रती मदनाला सोडून काळभैरवाशीं थोडेंच लग्न लावणार आहे ! हा घे आरसा नि पाहा त्यांत आपला चेहरा. "

भूत पाहून एखादा मनुष्य घाबरला नसता इतका भाई स्वतःचा आरशांतला

चेहरा पाहून घाबरला. ब्रह्मदेवानें काव्यशास्त्राचा खून करून जे तुकडे मिळाले त्यांनींच आपला चेहरा तयार केला असावा, असें त्याला वाटूं लागलें. भाईची तिरपीट उडालेली पाहून त्याच्या दोस्तांचा जीव खालीं पडला.

" काय भाई, आहे का तुझा चेहरा सिंहासारखा ? अरे दाढीमिशा राखल्या असत्यास तर आयाळ तरी दिसली असती तोंडावर! बायका पराक्रमावर भाळतात; पण त्याहि बाजूनें तूं दिवाळखोरच दिसतोस. तुझ्या कमरेला तरवार लटकण्याऐवजीं काव्यें करतां करतां तिचा कांटाच ढिला झाल्यासारखा दिसतो ! "

" मग आतां कसं करायचं रे भय्या ? " खुर्चीवरल्या न्यायाधिशाला एकदम आरोपीच्या पिंजऱ्यांत टाकलें तर तो जो केविलवाणा स्वर काढील त्यालाहि लाजवीत भाई म्हणाले !

" जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ! बाबा, मुलींच्या फोटोंना नाक मुरडणें सोपं आहे; पण आतां गळ्यांत माळ पडणार कुठून ? तुला तर कालिदास, शूद्रक, कोल्हटकर, गडकरी यांच्या सर्व नायिका शिजवून त्याचा एक अष्टमांश नाहीं तर एक षोडशांश केलेला असा काढा पाहिजे. त्या काढ्याला तशाच निकाढ्याची जरूर असणारच. शकुंतलेची इच्छा बाळगायला आपण दुष्यंत असावं लागतं आधीं बरं ! "

" तुझं हें उपदेशामृत सावकाश पितां येईल. पण झालेली चूक निस्तरायची कशी तें सांगशील कीं नाहीं ? रूप कांहीं गौरीपुढें ठेवायच्या सामानाप्रमाणें उसनं मागून आणतां येत नाहीं ! "

" त्याला उपाय एकच आहे. मुलीनं आपल्या रूपाची चिकित्सा करूं नये अशी इच्छा असल्यास आपणहि तिच्या रूपपरीक्षेच्या भानगडींत पडूं नये. जगाला आंधळं करायचं असेल तर आपण स्वतःच आधीं आंधळं झालं पाहिजे. "

" प्रेम आंधळं असतं असं कवि म्हणतात. तेव्हां प्रेम करण्याचाच जिथें प्रश्न आहे तिथें मी आंधळा होईन. जिच्याशीं लग्न करावयाचें त्या मुलींत कांहींतरी काव्य असलं पाहिजे बुवा ! नाहीं तर जन्मभर आपल्याच बायकोचा टीकाकार होऊन बसावें लागायचें ! "

" काव्यसरिता-काव्यवल्लरी-काव्यचंद्रिका असली मुलगी काढली आहे मी

शोधून. मग तर झालं ? पितृकुलाकडून ती एकनाथाची व मातृकुलाकडून मोरोपंताची वंशज होते."

"मग काय बहार होईल ?" एकनाथ व मोरोपंत यांच्यांतील पोटजातीचें भिन्नत्व लक्षांत न आल्यामुळें भाई आनंदून ओरडले. भय्यांनीं एकनाथाच्या ऐवजीं तुकाराम घातला असता तरी देखील त्यांना कांहीं शंका आली नसती.

"शिवाय ती गडकऱ्यांची मुलगी न् केशवसुतांची दूरची नात होते!" हें नातें ऐकतांच भाई जरा चपापले. पण भय्यांनीं गडकऱ्यांची मुलगी म्हणजे मानसकन्या असा अर्थ करून जिच्यावरून गडकऱ्यांनीं चिमुकली कविता लिहिली ती मुलगी हीच, असा सविस्तर खुलासा जोडला.

"आणखी कोणत्या कवीशीं तिचं नातं आहे का रे ?" भाईनीं उत्सुकतेनें विचारलें.

"तिला स्वतःलाच काव्याची जबरदस्त आवड आहे. आपल्या लहान भावाला खेळवतांना मोटार अगर शिटी असल्या रुक्ष गोष्टी ती दाखवीत नाहीं. 'चांदोबा ! चांदोबा ! भागलास कां ?' हें गाणंच ती म्हणते."

"चंद्राचं गाणं म्हणते ना ? बस्स ! ठरलं. लग्न करायचं तर तें या मुलीशींच, जिच्या तोंडांत नेहमी चंद्र तिचं तोंड चंद्रासारखं असणारच ! नसलं तर निदान होणार तरी खास."

"शिवाय ती कविकन्याहि आहे." भय्यांनीं जड झालेल्या पारड्यांत आणखी वजन टाकलें.

"भय्या, कसेंहि करून हें जुळवून टाका बुवा, सध्यां चातुर्मास वगैरे जर कांहीं असेल तर व्यंकोबाच्या गिरीवर जाऊं—पण नको रे बुवा त्या गिरीवर ! काय रुक्ष न् कठोर नांव ! व्यंकोबाचा गिरि म्हणे त्यापेक्षां धवलगिरीवर गेलेलं पुरवलं."

## ४

भय्यांची भाची कविकन्या तुंगा (तुंगाचें माहेरचें आडनांव 'कवि' होतें हें येथें सांगणें अवश्य आहे!) सुलोचना होऊन भाईची सहचारिणी झाली. लग्नाच्या वेळीं अंतरपाट दूर होतांच तिनें लाजून भाईकडे जेव्हां पाहिलें तेव्हां तिचे डोळे कमळासारखे आहेत कीं नाहींत हें पाहण्याचें भानच भाईना

राहिलें नाहीं. त्या ओझरत्या कटाक्षाबरोबर अदृश्य वीज भाईंना आपल्याकडे येत आहे असें वाटलें व तिनें आगीऐवजीं त्यांच्या हृदयावर अमृताची वृष्टि केली. पाणिग्रहण, लाजाहोम वगैरे सर्व विधींमध्यें तिच्या हाताचा स्पर्श होतांच काव्यांतील सर्व किसलयांपेक्षां तो अधिक कोमल आहे असें भाईंच्या अनुभवाला आलें. नक्षत्रदर्शनाच्या वेळीं तर ते आकाशाकडे दृष्टि फेंकावयालाहि तयार नव्हते. जवळ चालतें बोलतें नक्षत्र असतांना आकाशाकडे दीनवाणेपणानें पाहणें म्हणजे कुबेरानें शंकराकडे संपत्ति मागण्याकरतां जाणें आहे असाहि विचार त्यांच्या मनात आला. पत्नीच्या झांकल्या मुठींत सुपारी आहे हें माहीत असतांनाहि मूठ उघडल्यावर ती सव्वा लाखाची असल्याइतका आनंद भाईंना झाला.

जीवनांत किती काव्य भरलेलें असतें हें सुलोचनेच्या सहवासांत भाईंना कळून येऊं लागलें. शब्दांपेक्षां कंकणध्वनींत असलेलें नादमाधुर्य, काव्यकथेपेक्षां केशकलापांत दिसून येणारी मोहक रचना, स्वभावरेखनापेक्षां कुंकुमतिलकाच्या रेखनांत दिसून येणारें नाजूक कौशल्य त्यांना अधिक आवडूं लागलें. आजपर्यंत सुलोचनेवांचून आपण जगांत दिवस कंठले तरी कसे याचें त्यांचें त्यांनाच आश्चर्य वाटे. या प्रेमनिर्भर मनःस्थितींत ते एकदां पत्नीला म्हणाले, “ सुलोचने, तुझ्यासारखं सौंदर्य स्वर्गांत देखील सांपडणार नाहीं.”

सुलोचना हंसत हंसत म्हणाली, “ मी न् सुंदर ? माझ्या नाकाची चांफेकळी एक दशांश इंच अधिक विकासली आहे न् तोंड—”

भाईंनीं सुलोचनेचें तोंड बंद केलें !

* * *

त्याच दिवशीं संध्याकाळीं गांवांतील मोफत वाचनालयाला हजाराहून अधिक काव्यांचीं पुस्तकें भाईकडून देण्यांत आलीं. मोफत वाचनालयानें लगेच भाईंचें अभिनंदन करण्याकरितां भय्यासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरविली. अध्यक्ष प्रास्ताविक भाषणांत म्हणाले, “ इतक्या काव्यग्रंथांचा सहवास एकदम अंतरल्यामुळें भाईंच्या जीवनांतील काव्य कमी होईल कीं काय अशी आम्हांला भीति वाटते !’

भाई एकदम उद्गारले, “ घरांत जिवंत काव्य आल्यामुळें नकली काव्यांची अडगळ मी काढून टाकली; यापेक्षां अधिक असं मी कांहींच केलं नाहीं !”

" समुद्र आणि माणसांचें मन दोन्हीं सारखींच ! "

मी चमकून मागें पाहिलें. केबिनमधला उतारू हंसत हंसत माझ्याकडे पाहात होता. तसें पाहिलें तर माझ्या सारख्या माणसाला—समुद्रांतच ज्याचें घर त्याला—समुद्राकडे पहाण्यांत एवढी कसली मौज वाटावी ? पण त्या दिवशींचा समुद्रहि नेहमीपेक्षां कांहीं निराळाच दिसत होता. कप्तानाचें काम करताना मी समुद्राचीं सर्व रम्य व भीषण रूपें पाहिलीं होतीं; पण त्या दिवशींचें त्याचें स्वरूप इतकें सौम्य, वत्सल व आनंददायक होतें कीं सर्व काम सोडून त्याच्याकडे पहाण्यांतच मी गुंग होऊन गेलों. अवखळ तान्हें मूल पाळण्यात झोपीं गेलें म्हणजे त्याच्या शांत निश्चल मूर्तीकडे माता ज्या दृष्टीनें पहात असेल तिची त्यावेळीं मला आठवण झाली. बोट तर मुळींच हालत नव्हती. वातावरणांतून शांतपणें पोहणाऱ्या एखाद्या पक्ष्याप्रमाणें ती डुलत डुलत पुढें जात होती आणि माझें मनहि मंद मंद झोके घेत तिच्या-बरोबर डुलत होतें. तसेंच पाहिलें तर रत्नागिरी बंदर येईपर्यंत मला तरी काय काम होतें ?

त्या उतारूच्या विचित्र उद्गाराला मी मंद स्मितानेंच उत्तर दिलें.

मला नमस्कार करीत तो म्हणाला " कसं काय कप्तानसाहेब ? समुद्र आणि माणसाचं मन हीं दोन्हीं सारखींच नाहींत का ? "

कोटीवर प्रतिकोटि करण्यांत मी कांहीं मोठा तरबेज नाहीं. पण कांहीं तरी बोलावयाचें म्हणून मी म्हणालों, " दोन्ही सारखींच कशीं होतील ? समुद्राचा अंत काढतां येतो; पण माणसाच्या मनाचा अंत कधीं कोणाला लागला आहे का ? "

निरभ्र आकाश एकदम भरून यावें त्याप्रमाणें त्याचा चेहरा माझे हे शब्द ऐकतांच काळवंडला. पण चटकन् उसनें हास्य तोंडावर आणीत तो म्हणाला, " माणसाच्या मनाचाहि अंत लागतो; पण तो ज्याचा त्यालाच. "

पुढें मी कांहींच बोललों नाहीं. थोडा वेळ दोघेहि समुद्राच्या लाटांवर नाच-णाऱ्या सूर्यकिरणांकडे पहात उभे होतों. मघाच्या विचित्र संवादानें आलेला

खिन्नपणा दूर करण्याकरितां मी त्या गृहस्थाला म्हणालों, " समुद्राचे केवढे उपकार आहेत आपल्यावर ! पहा, कुठें हिंदुस्थान आणि कुठें अमेरिका. पण समुद्रानं कसं जोडून टाकलं आहे दोघाना ! "

" हिंदुस्थान आणि अमेरिकाच कशाला ? इहलोक आणि परलोक हेसुद्धां समुद्रानें जोडले आहेत. " आपल्या बोलण्याचा अर्थ कदाचित् माझ्या लक्षांत येणार नाहीं म्हणून तो हंसत हंसत म्हणाला—

" समुद्र हें इहलोक आणि परलोक यांच्यामधलें दार आहे असं नाहीं का तुम्हांला वाटत ? मी असा या कठड्यावर रेलून उभा आहें. समजा, चुकून माझा पाय घसरला—दुसऱ्या क्षणीं माझं पाऊल परलोकांत पडेल. कां, मी म्हणतों तें खरं आहे कीं नाहीं ? "

त्या मनुष्याचे हे विलक्षण उद्गार ऐकून माझें मन अस्वस्थ होऊन गेलें. अंधारकोठडींत कोंडलेल्या कैद्याचें डोकें फिरून तो जसें वेडेंवाकडें बोलूं लागतो त्याप्रमाणें कसल्या तरी विलक्षण दुःखाच्या कोंडमाऱ्यानें हा मनुष्य असें असंबद्ध बरळत सुटला आहे, अशी कल्पना माझ्या मनात येऊन गेली. मी त्याला नखशिखांत न्याहाळून पाहिलें. चांगला श्रीमंत मनुष्य दिसला तो! केबिननें प्रवास करणारा भिकारी थोडाच असणार आहे म्हणा! या मनुष्याच्या अंतःकरणांत कोणतें शल्य सलत असावें. या विचारांत गुंग होऊन मी त्याला काहींच उत्तर दिलें नाहीं. माझें मन मात्र "समुद्र आणि माणसाचं मन दोन्ही सारखींच " या त्याच्या वाक्याभोंवतीं एकसारखें भ्रमत होतें.

मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो म्हणाला, "कप्तानसाहेब, या साध्या थट्टेने भिऊन गेलां कीं काय तुम्हीं ? तसं म्हटलं तर तुम्हाला मृत्यूशीं नेहमींच तोंडओळख ठेवावी लागते. "

मी उत्तरलों " तोंडओळख असली तरी तुमच्याप्रमाणें त्याच्या गळ्यांत गळा घालून फिरण्याइतकें धैर्य नाहीं आपल्याला. "

आपली तीव्र दृष्टि माझ्यावर रोखून तो म्हणाला, " मला तरी तितकं धैर्य आहे असं का तुम्हांला वाटतं ? अहो, डोंगराप्रमाणं मृत्यु देखील दुरूनच बरा दिसतो."

त्याचें हें वाक्य ऐकताच हा गृहस्थ एखादा कवीबिवी तर नाहीं ना, अशी मला शंका आली. पण तिचें त्याच्या पुढल्याच उद्गारांनीं निरसन केलें.

तो म्हणाला, "कप्तानसाहेब, समुद्र हें इहलोक आणि परलोक याच्यामधलें

दार आहे असें मी मघाशीं म्हटलें ना ? केवळ धंद्यामुळें मला कल्पना सुचली ती ! आम्हां इंजिनिअर लोकांना काय हो ? समुद्र असो नाहीं तर हवा असो, घरंदारं, रस्ते, पूल, याच्याखेरीज दुसरं काय सुचायचंय आम्हांला ? पुष्कळ वेळां आम्हांला असं वाटतं कीं पृथ्वीपासून आकाशापर्यंत एक उत्तम जिना बांधतां येईल तर काय बहार होईल ! एखाद्या बंगल्याच्या गच्चीवर जाऊन आपण मजेनें बोलत बसतों ना, त्याप्रमाणें आकाशांत जाऊन जर बोलत बसतां येईल–"

त्याला काय उत्तर द्यायचें हेंच मला सुचेना ! मी समुद्राकडे पाहूं लागलों, पण मघांची ती रम्य सृष्टि आतां कुठल्याकुठें नाहींशी झाली होती. मघाशीं झोंपलेल्या बालकाप्रमाणें भासणारा समुद्र आतां निष्प्राण बालकासारखा दिसूं लागला होता.

—२—

रत्नागिरी केव्हांच मागें पडली होती. आजची हवा इतकी सौम्य होती–जणूं काहीं सज्जनाचा स्वभावच ! अर्थात्, मला स्वतःला थोडी झोंप घ्यायला कांहींच हरकत नव्हती. आरामखुर्चींत अंग टाकून मी डोळे मिटले आणि निद्रादेवीची आराधना करूं लागलों. समुद्राच्या लाटांचा मंद ध्वनि कानांवर आदळत होता व वायूची शीतळ लहर मधून अंगावरून जात होती. ते मधुर संगीत बोल नि तो सुखकारक स्पर्श यांच्या मोहिनीनें मी किती वेळ निद्रावश झालों कुणाला ठाऊक ! स्वप्नामध्यें समुद्राच्या तळाशीं जाऊन तिथलीं सुंदर रत्नें मीं बाहेर घेऊन येत आहें असें दिसायला आणि त्याच वेळीं "अपघात ! अपघात !" अशा आरडाओरडा माझ्या कानांवर पडायला एकच गांठ पडली. मी दचकून डोळे उघडले आणि पाहतों तों खलाशांची धांवपळ सुरू झाली आहे. बाहेर येतांच तो केबिनमधला मनुष्य समुद्रांत पडल्याची बातमी मला कळली. बोट लगेच थांबवली. होड्या समुद्रांत सोडल्या. मी व खलाशी निरनिराळ्या होड्यांत बसून आजूबाजूला पाहूं लागलों, पण काय ? त्या बुडालेल्या मनुष्याचा भाससुद्धां कोठें झाला नाहीं. आकाशांत चमकून पुनः त्यांत नाहींशी होणारी वीज जशी शोधून काढतां येत नाहीं, त्याप्रमाणें त्या मनुष्याला शोधून काढणें आम्हांला सर्वथैव अशक्यच होतें.

शून्य दृष्टीनें हें शून्य संशोधन संपवून आम्ही बोटीवर आलों. बोट पुन्हां

चालू झाली, पण तो गृहस्थ, त्याचे दुपारचे ते चमत्कारिक उद्गार आणि अपघातानें आलेलें मरण या सर्व गोष्टी पुनःपुन्हां माझ्या डोळ्यापुढें उभ्या राहात होत्या. केव्हातरी त्याच्या सामानाची विल्हेवाट लावलीच पाहिजे हें लक्षांत घेऊन मी त्याच्या खोलींत प्रवेश केला. सर्व सामान जिथल्या तिथें होतें. निजण्यामुळें किंचित् विस्कटलेल्या त्याच्या बिछान्यावरील पलंगपोस तसाच पडला होता. पायाशीं पडलेली चादर जणुं काय आपला मालक परत येईल म्हणून वाट बघत बसली होती. तो बिछाना पाहतांच नकळत माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. मानवी जीवनाची क्षणभंगुरता अशा विचित्र रीतीनें क्वचितच दृग्गोचर होत असेल. बिछान्याकडे पाहतां पाहतां माझी दृष्टि उशीवर ठेवलेल्या एका मोठ्या पाकिटाकडे गेली. पाकीट बंद केलेलें नव्हतें. आंत काय आहे हें पाहण्याकरतां मी उत्सुकतेनें तें उघडलें; आंत एक पत्र मात्र होतें ! तें पत्र वाचण्याचा मला अधिकार आहे कीं नाहीं हा विचारसुद्धां त्या वेळीं माझ्या मनाला शिवला नाहीं. मी तें विलक्षण उत्कंठेनें वाचूं लागलों.

—३—

" उद्यांचीं वर्तमानपत्रें ' अपघातानें बुडून मृत्यू ' म्हणून मोठ्या मथळ्यांत माझ्या मृत्यूची बातमी छापतील; परंतु माझं मरण अपघाताचें नसून स्वाभाविक रीतीनें आलेलें आहे. स्वाभाविक म्हणजे स्वभावापासून उत्पन्न झालेलें. माझ्या हातून घडलेल्या भयंकर पापाचें प्रायश्चित्त घेण्याकरितां मी समुद्रांत उडी टाकून जीव देत आहें.

जगांतले शहाणेसुरते लोक म्हणतील कीं, आत्महत्या हें मोठें पाप आहे. पण मी करतों आहे ती आत्महत्या कुठें आहे ? ज्याला आत्मा असेल त्यानें आत्महत्येची भीति बाळगायची. माझ्या पत्नीबरोबर माझा आत्मा या जगांतून नाहींसा झाला. दुसरे कित्येक लोक म्हणतील कीं आत्महत्या करायची होती तर समुद्रांत उडी कशाला टाकायला पाहिजे होती ? एखादें चांगलें ॲसिड—पण नाहीं ! मला नुसतें मरायचें नाहीं. मला माझ्या पापाचें पुरेपूर प्रायश्चित्त घ्यायचें आहे. तें घेण्याचा मार्ग समुद्र हाच !

समुद्र ! समुद्रावर आजपर्यंत पुष्कळांनीं काव्यें केलीं असतील. मी सुद्धां

कॉलेजच्या पहिल्या वर्गांत असतांना "समुद्र आणि प्रिया" या नांवाची एक कविता लिहिली होती. ती आतां मला स्मरत नाहीं. आणि समुद्रांतलें काव्यहि मला आतां दिसत नाहीं. माझ्या दृष्टीनें समुद्र हा अत्यंत दुष्ट मनुष्याचा साथीदार मात्र होऊं शकतो. पुष्कळांना हें कदाचित् खरेंहि वाटणार नाहीं; पण जें खरें वाटतें तें तरी खरें कुठें असतें ?

पापाची कबुली दिल्याशिवाय प्रायश्चित्ताचा परिणाम होत नाहीं म्हणतात ! तें खरें असो वा खोटें असो. मला माझ्या पापाचा पाढा वाचलाच पाहिजे. जगांतल्या एखाद्या पुरुषाला माझ्या या कर्मकथेचा उपयोग झाला तरीसुद्धां माझी आत्महत्या सफल झाली असें मी समजेन.

माझ्या पत्नीवर माझें प्रेम नव्हतें असें म्हणण्याची ब्रह्मदेवाची सुद्धां छाती नाहीं. प्रेम होतें म्हणूनच—

आमचें लग्न होऊन नाहीं म्हटलें तरी सहा वर्षें होऊन गेलीं होतीं. लग्नानंतर सहादां वसंतऋतु आला आणि गेला, पण माझ्या पत्नीच्या आशालतेवर अपत्यलाभाचें फूल एकदांहि फुललें नाहीं, पावसाळाहि सहा वेळां आला आणि गेला; पण आकाशांत चमकणाऱ्या विजेप्रमाणें घरांत रांगणारें अपत्य पाहण्याची तिची इच्छा सफल झाली नाहीं.

मूल नाहीं म्हणून मलाहि केव्हांतरी वाईट वाटे. पण तें केव्हांतरीच ! माझें दुःख पायाला बोंचणाऱ्या सराट्यासारखें; उलट तिचें दुःख पायांत रुतून बसलेल्या कांचेच्या तुकड्याप्रमाणें. तिचें दुःख मला कळत नव्हतें असें नाहीं; पण एवढें मात्र खरें कीं त्याची तीव्रता मला कधींच जाणवली नाहीं. एखाद्या मोठ्या नदीवर बांधलेल्या उंच पुलाला ज्याप्रमाणें पाणी क्वचितच स्पर्श करूं शकतें त्याप्रमाणें अपत्यहीनतेचें दुःख माझ्या मनांतल्या मनाला अगदीं विरळाच जाचत असे. माझ्या पत्नीची स्थिति मात्र अगदीं उलट होती. नदीच्या कांठावर असलेलें सुंदर देवालय दरवर्षी नदीला पूर आला म्हणजे जसें बुडून जातें, त्याप्रमाणें शेजारीपाजारी एखाद्या बाईला डोहाळजेवण झालें अगर एखादें बारसें झालें कीं तिच्या दुःखाला नकळत चालना मिळे.

अशा स्थितींत कोंकणांतला एक मोठा पूल बांधण्याच्या कामावर माझी योजना झाली. हें पुलाचें काम यशस्वी रीतीनें पार पडलें कीं, मला मोठी बढती मिळणार ही गोष्ट अगदीं निश्चित होती. त्या आनंदाच्या भरांत मी माझ्या पत्नीचें

अस्तित्व जवळजवळ विसरूनहि गेलों. माझ्याबरोबर मी तिला कोंकणांत आणली होती; पण सकाळपासून संध्याकाळपर्यंत मी बहुधा घराबाहेरच असे. एखादे वेळीं मधेंच घरीं आलों तर ती आपल्या देवपूजेंत व सोवळ्याओवळ्यांत निमग्न होऊन गेलेली दिसे.

माझा देवावर जवळजवळ विश्वास नव्हताच म्हटलें तरी चालेल. तिला वाईट वाटूं नये म्हणून मी घरामध्यें देवांचें बंड सुरू ठेविलें होतें इतकेंच. कोंकणांत येऊन एक दोन महिने झाल्यानंतर आमच्या देव्हाऱ्यांतल्या देवांची संख्या फुगत चालली आहे असें सहज माझ्या लक्षांत आलें. मी तिला थट्टेनें म्हणालों, “ हल्लीं काय देवीबिवी बाळंत जाहल्या वाटतं ? ” तिनें कांहींच उत्तर केलें नाहीं असें पाहून मी पुढें म्हणालों, “ कोंकणांत दगडांना कांहीं तोटा नाहीं. अगदीं मोजून तेहतीस कोटी देव तयार करतां येतील. ”

तरीहि ती कांहीं बोलली नाहीं. कांहीं करून तिला बोलायला लावायचेंच असा निश्चय करून मी म्हटलें , “एवढे शक्तिमान देव आहेत तुझ्या हातांत आमचा पूल तरी करून दे एका दिवसांत. तो लंगडा बाळकृष्ण चांगला उपयोगी पडेल पुलाच्या कामाला. ”

ती चिडून कांहींतरी उत्तर देईल अशी माझी अपेक्षा होती. पण तिच्या ओठांतून शब्द बाहेर पडण्याऐवजीं डोळ्यांतून अश्रु मात्र बाहेर आले. गुद-गुल्या करतां करतां त्याचें रूपांतर नकळत चिमट्यांत व्हावें तसें माझें त्या दिवशींचें बोलणें झालें. त्या दिवशीं कामाच्या गर्दींतहि रात्रीं या बोलण्या-बद्दल तिची क्षमा मागायची असें मी मनाशीं ठरविलें. पण त्या दिवशीं रात्रीं मी दमून इतक्या उशीरा घरीं परत आलों कीं जेवल्यानंतर मी अंथरुणावर लवंडलों तों तिथल्या तिथेंच मला झोंप लागली.

त्या झोंपेंतहि माझ्या मनाला कसली तरी रुखरुख लागून राहिली होती. बाहेरून धडधाकट दिसणारी तुळई आंतून पोखरलेली असावी त्याप्रमाणें माझ्या गाढ झोंपेंतहि विलक्षण अस्वस्थपणा होता. त्या अस्वस्थपणानेंच मी एकदम जागा झालों. घड्याळांत पाहिलें. तों नुकतेच बारा वाजून गेले होते. अपरात्रीं पत्नीला उठवून तिची क्षमा मागितली तर ही सारीच गोष्ट तिला पोरकटपणाची वाटेल असा विचार माझ्या मनांत येऊन गेला; पण वारा सुटला म्हणजे पवनचक्की जशी नकळत फिरूं लागते त्याप्रमाणें माझ्या मान

सिक अस्वास्थ्यानें माझी इच्छा अधिकच तीव्र झाली. तिला उठविण्याकरितां म्हणून मी तिच्या अंथरुणाकडे गेलों तों तें रिकामें ! कुठें तरी बाहेर गेली असेल म्हणून वाट पहात मी माझ्या अंथरुणावर बसलों. पांच मिनिटें झालीं, दहा मिनिटें झालीं, पण तिचा कुठें पत्ता नाहीं, मी खोलीबाहेर येऊन पाहिलें. कुठेंच तिची जाग नाहीं. स्वयंपाकघरांत निजलेल्या स्वयंपाकीणबाईला उठवावें अगर ओटीवरल्या गड्याला हांक मारून त्याच्याकडे चौकशी करावी असा विचार मनांत येतो न येतो तोंच मी तो धुडकावून लावला. नकळत कांहीं तरी विचित्र कल्पना माझ्या मनांत चमकून गेली. मागच्या दारीं जाऊन पाहिलें त्याला कडी नव्हती. मध्यरात्रीच्या वेळेला पिशाच्चें इकडे तिकडे भटकत असतात म्हणे. त्यांपैकीं एक पिशाच्च त्यावेळीं माझ्या अंगांत संचारलें असावें. कांहीं असो, कसलीच चौकशी न करतां मी माझ्या बिछान्यावर येऊन पडलों.

दुसरे दिवशीं रात्रीं मी झोपेचें सोंग आणण्याचा प्रयत्न करीत अंथरुणावर पडलों होतों खरा ! पण पैशाप्रमाणें झोपेचेंहि सोंग आणतां येत नाहीं हेंच खरें. माझी तळमळ पाहून ती म्हणाली, “ काय होतेंय आपल्याला.”

“ कांहीं व्हावं इतकं कुठं आहे माझं भाग्य ? ” मी तिरसटपणानें उद्‌गारलों.

“ असं काय वेडंविद्रं बोलायचं तें ? ” ती माझ्या कपाळावर हात ठेवीत म्हणाली “ कपाळ तरी किती तापलं आहे आज ! ”

“ अंतःकरणावर निखारे ठेवले म्हणजे कपाळ तापायचंच ” असं कांहीं तरी बोलण्याची इच्छा मला उत्पन्न झाली; पण ती मोठ्या प्रयासानें दाबून मी स्वस्थ पडून राहिलों.

ती हंसत हंसत म्हणाली, “ घरांत मूल नसलं कीं असं होतं; मूल म्हणजे आईची ढाल ! ”

“ ही ढाल घेऊन लढाई करायची कुणाबरोबर ! नवऱ्याबरोबरच ना ? ” मी कुत्सित स्वरानें विचारलें.

ती बिचारी काय उत्तर देणार ? डोळे पुशीत ती म्हणाली, “ कांहीं चूक झाली आहे का माझ्याकडून ? ”

" खंडीभर देवांची पूजा करणारीं माणसं चुकतील ? छेः, असं कधींच होणार नाहीं. " मी तिरस्कारानें उदगार काढले.

मोठ्या कष्टानें झोपेच्या सोंगाची बतावणी मी बेमालूम केली. बरोबर बारा वाजले असतील. ती पाऊल न वाजवितां माझ्या अंथरुणापाशीं आली आणि मी जागा आहे कीं काय याचा कानोसा घेऊन हळूंच खोलीबाहेर गेली. माझी झोंप गाढ आहे आणि उभ्या रात्रींत मी एकदांसुद्धां जागा होत नाहीं हें तिला सहा वर्षांच्या अनुभवावरून ठाऊक होतें. या अनुभवाचा भलताच फायदा घ्यायला तिनें सुरुवात केली अशी माझ्या मनाची खात्री होऊन चुकली. अपरात्रीं ही बाहेर जाते कुठें याचेंच मला कोडें पडलें. थोड्या वेळानें उठून मी बाहेर आलों. पुढच्या दाराला आंतून कडी होती. ती खास मागच्या दारानें बाहेर गेली असली पाहिजे. मी तिनें लोटलेलें मागचें दार हळूच उघडून बाहेर आलों. तारकांच्या मंद प्रकाशांत कुणी तरी रस्त्यानें जात आहे एवढेंच दिसत होतें. अत्यंत क्षुब्ध मनस्थितींत मीहि त्याच वाटेनें जाऊं लागलों. मला तिच्या धाडसाचें अत्यंत आश्चर्य वाटत होतें.

' पापाला डोळे नसतात हेंच खरें ! ' मी मनाशीं म्हटलें. नाहीं तर सृष्टीला ज्या वेळीं स्मशानकळा येते त्यावेळीं दिवासुद्धां न घेतां अंधारांतून बाहेर जाण्याचें धैर्य तिच्यासारख्या पांढरपेशा स्त्रीच्या अंगीं यावं कुठून ? मधूनच ऐकूं येणारी कोल्हेकुई, त्या कोल्हेकुईमुळें होणारा कुत्र्यांचा कलकलाट, रातकिड्यांची भेसूर किरकीर, एक म्हटल्या एक गोष्ट देखील आनंदाचा आभाससुद्धां उत्पन्न करण्याला समर्थ नव्हती ! आणि असावी तरी कुठून ? प्रेतक्रियेशीं संलग्न असणाऱ्या सर्वच गोष्टी अशुभ व अमंगल असतात. माझ्या घरांतला विश्वास श्रद्धा आणि प्रेम यांची ही जी प्रेतयात्रा निघाली होती त्याला शोभण्यासारखेंच साहित्य सृष्टीनें यावेळीं तयार केलें होतें.

चालतां चालतां ती एका देवळापाशीं येऊन थांबली. त्या देवळाच्या शेजारींच एक भिक्षुक राहत असे. कोंकणांत आल्यापासून घरीं पूजेला तोच येई. त्याची माझी विशेष ओळख झाली नसली, तरी तो राहातो कुठें हें माझ्या बायकोच्या बोलण्यावरून मला पूर्वींच कळून चुकलें होतें. असल्या भिकारड्या भिक्षुकाच्या घरीं माझ्यासारख्याच्या बायकोनें अपरात्रीं यावें यापेक्षां अधिक दुःखदायक गोष्ट दुसरी कोणती असणार ? माझ्या डोक्यांत

आगीचा डोंब उसळला. वाटलें कीं धांवत जाऊन समुद्रांत उडी घेतली तरच ही आग विझेल. अथेल्लोनें जिवलग बायकोचा खून कां केला याची या वेळीं मला पूर्ण कल्पना आली. पण ती त्या भिक्षुकाच्या घरांत जाऊन दिसेनाशी झाल्याबरोबर चरफडत घरीं येण्याखेरीज मी दुसरें कांहींच करूं शकलों नाहीं.

दुसरे दिवशीं दुपारीं मी सुन्न मनानें आरामखुर्चींत पडलों होतों. तिनें जवळ येऊन विचारलें, " कालच्यांसारखंच आजहि कपाळ ऊन आहे का ? "

मी कांहींच बोललों नाहीं. तिनें आपला उजवा हात कपाळावर ठेवला. तिच्या हातांत नेहमींची अंगठी नाहीं हें केवळ स्पर्शानें मला कळलें. मी तिच्या हाताकडे निरखून पहात विचारलें " अंगठी कुठं आहे हातांतली ? "

" अंगठी ? " ती चपापून म्हणाली. पायाखालीं जणुं कांहीं एखादें जिवाणूं सांपडावें अशी तिची त्रेधा उडाली. तिला कांहींच बोलतां येईना. मी तिला म्हटलें, " हरवली वाटतं अंगठी ? अंगठी हरवली कीं काय दुःखें भोगावीं लागतात, हें आहे ना ठाऊक ? शाकुंतल नाटक पहायला तूं नि मीच गेलों होतों मुंबईला ! "

दंवबिंदूंनीं भरून गेलेल्या कमलपत्राप्रमाणें तिचे डोळे दिसूं लागले. पण मी स्वतःशीं विचार केला—रडणें हें बायकांचें शस्त्र आहे ! तिनें जर आपलें शस्त्र उपसलें आहे तर आपणहि आपलें शस्त्र कां चालवूं नये ? स्वर शक्य तितका मोठा करून मी तिला विचारलें, " अंगठी कुठं हरवली हें आठवत सुद्धां नाहीं का ? एवढा मोठा समुद्र गांवाजवळ आहे, त्यांत पडली असेल ती ! "

ती डोळे पुशीत आंत निघून गेली. मीहि कामावर गेलों. दुसरे दिवशीं महोदय का कसलेंसें पर्व होतें म्हणे. कामावरचीं माणसें रजा मागायला लागलीं तेव्हां मला पत्ता लागला त्याचा. रात्रीं घरीं परत आलों तों तिनेंहि पर्वाची बातमी माझ्या कानावर घातली.

" जोडप्यानें उद्यां समुद्रावर जायचं ना ? " तिनें भीत भीत विचारलें.

" कशाला ? "

" पर्वादिवशीं जोडप्यानें स्नान केलें कीं पुण्य लागतें म्हणे मोठें. "

" आणि पाप कशानें लागतें ? " मी एकदम तिच्यावर नजर रोखून विचारलें.

बंदुकीचा आवाज ऐकतांच पांखरूं ज्याप्रमाणें घाबरून भुर्रकन् उडून जातें, त्याप्रमाणें ती माझ्या समोरून तत्काळ निघून गेली. पण काय असेल तें असो, दुसरे दिवशींच्या स्नानाची कल्पना कांहीं केल्या तिच्या डोक्यांतून गेली नाहीं. रात्रीं तर तिनें मला गळच घातली. मी परोपरीनें तिची थट्टा केली. पण ती लाडकेपणानें स्नानाचा हट्ट धरून बसली.

दुसरे दिवशीं सकाळीं तिच्याबरोबर मी स्नानाला गेलों. वाळवंटांत जणुं कांहीं माणसांचा दुसरा समुद्रच पसरला होता. त्या अफाट समुद्रांत ती एका विशिष्ट दिशेनें चाललेली पाहून मला आश्चर्य वाटलें. चालतां चालतां संकल्प सांगणारे भटजी बसले होते त्या जागीं आम्ही आलों. आमच्या घरीं पूजेला येणारा भट होताच तिथं ! संकल्प घेण्याकरितां मी त्याच्यापुढें बसलों व त्याच वेळीं त्याच्या उजव्या हाताकडे माझी नजर गेली. तिच्या हातांतली अंगठी ! अंगठी कुठें हरवली हें तिला आठवत नव्हतें ! पण ती अचुक या भटाच्या हातांत यावी कशी ? माझें डोकें गरगर फिरूं लागलें. समोर पसरलेला समुद्र गर्जना करून जणुं कांहीं माझ्या बायकोचें वाईट वर्तन जगाला जाहीर करीत आहे असा मला भास झाला. मी तिच्याकडे जळणाऱ्या डोळ्यांनीं पाहिलें. पण ती आपल्या पूजेच्या साहित्यांतच निमग्न होती.

पाण्यांत पाऊल टाकतां टाकतां ती म्हणाली, " मला किनई फार भीति वाटते समुद्राची. "

" आणखी नाहीं का कशाची वाटत ? " मी शुष्क स्वरानें विचारलें, " माझी. "

" इश्य ! इकडली कसली भीति वाटणार ? "

" मी आणि समुद्र सारखेच नाही का ? "

" पुण्य देण्याच्या दृष्टीनें सारखेच. पण समुद्र माणसांना बुडवितो, इकडे कांहीं—"

कोणत्या कुमुहूर्तावर ती हे शब्द बोलली !

पुढें ती कांहींच बोलली नाहीं. पण तिच्या थरारणाऱ्या हातावरून ती

पाण्याला किती भीत आहे याची मला कल्पना आली. माझ्या हाताचा आधार घेऊन पुढें पाऊल टाकीत ती म्हणाली, " पुरे नाहीं इथंच ? "

मी हंसून उत्तरलों, " इथंच ! इथं तर गुडघाभर देखील पाणी नाहीं. अशा भित्र्या आईला उद्यां मूल झालं तर तेंहि भित्रंच व्हायचं. "

काय कारण असेल तें असो ! कांहींच न बोलतां ती माझा हात धरून पुढें येऊं लागली. आजबाजूची तांब्या घेऊन समुद्रस्नानाचें पुण्य संपादणारी पुष्कळ मंडळी आमच्याकडे टकमक पाहूं लागली. घाटावरल्या बाईला कदाचित् पोहतां येत असेल असा त्यांचा समज झाला असावा. गर्दीपासून दूर अशा जागीं मी आणि ती जाऊन उभी राहिलों. कुविचाराप्रमाणें एकामागून एक आणि एकाहून एक मोठ्या अशा लाटा येऊं लागल्या. नाकातोंडांत पाणी जाऊन ती अगदीं घाबरून गेली.

" परत जाऊं या आपण " तिनें कांपत कांपत उद्गार काढला. पण त्यावेळीं संशयपिशाच्चाचा अंमल माझ्या मनावर पूर्णपणें बसला होता. तिचें अपरात्रीचें घराबाहेर जाणें, विशेषतः त्या भिक्षुकाच्या घरीं जाणें, त्या भटाच्या हातांत आताच मी पाहिलेली ती अंगठी, या सर्वांचा अर्थ माझ्या दृष्टीनें एकच होता. तो सारा अनर्थ, बेअब्रू, अपमान, दुःख एका क्षणांत मला नाहींसें करतां येण्यासारखें होतें. मी समोर पसरलेल्या समुद्राकडे पाहिलें. समुद्रस्नानानें पुण्य लागतें या गोष्टीचा उलगडा त्यावेळीं मला झाला. जगांतलें एक पाप कमी करणें म्हणजे पुण्य संपादन करण्यासारखें नाहीं का ? संशय आंधळा असतो. इतकेंच नव्हे तर त्याच्या हातांत भयंकर कोलीत असतें. त्या कोलितानें कोणत्या वस्तूला केव्हां आग लागेल याचा नियमच नाहीं. माझीहि स्थिति तशीच झाली. वावटळींत गिरक्या खात जाणाऱ्या पानाप्रमाणें त्या संशयी विचारांच्या प्रवाहांत मी वाहून गेलों ! आणि— माझी पत्नी—अरे देवा !

जगांत आजपर्यंत लाखों लोकांनीं अमानुष खून केले असतील; पण माझ्यासारखा क्रूर खुनी मनुष्य जगांत आजपर्यंत झाला असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. त्या दिवशीं माझें सांत्वन करण्यासाठीं किती तरी लोक माझ्या घरीं येऊन गेले. ' समुद्राचें पाणी असंच फसवं ' एखाद्यानें म्हणावं. दुसऱ्यानें उद्गार काढावे, ' आयुष्याची दोरी तुटली तिथं कुणाचा काय

इलाज चालणार ?' तिसऱ्यानें हळहळत म्हणावें, 'किती धार्मिक होत्या वहिनीबाई. या गांवांत अनाथ अपंगाला कधींच विन्मुख पाठविलं नाहीं त्यांनीं.'

त्यांचे हे उद्गार ऐकून मनांतल्या मनांत हंसूं येत होतें. समुद्र फसवा कीं मी फसवा ? तिच्या आयुष्याची दोरी तुटली कीं मी तोडली ? अन् तिचा धार्मिकपणा—परक्या गांवांतल्या भटाच्या गळ्यांत पडणारी बाई धार्मिक !

तो दिवस मी उन्मादांतच घालविला. पण दिवसाबरोबर माझा उन्माद हळूहळू मावळूं लागला ! रात्रीच्या शांत वातावरणांत माझें क्षुब्ध मनहि शांत झालें. 'मी आज काय केलें ?' हा एकच विचार राहून राहून माझ्या डोळ्यां-पुढें उभा राहूं लागला. बाहेर पसरलेल्या अंधाराकडे शून्य दृष्टीने पाहतां पाहतां माझ्या डोळ्यांपुढें दोन चित्रें उभीं राहिलीं. पहिलें सहा वर्षांपूर्वींचें आणि दुसरें आजचें. सहा वर्षांपूर्वींच तिचा हात हातांत घेऊन मी लाजाहोमाला प्रदक्षिणा घातल्या होत्या; आणि आज तोच हात हातांत घेऊन मृत्यूच्या दारांतून मी तिला पलीकडे ढकलून दिलें होतें. लग्नाच्या वेळीं आंतरपाटाआड उभी असलेली तिची मूर्ति पहाण्याकरितां मी किती उत्सुक झालों होतों ! आज तिला काय-मची डोळ्याआड करतांना मी मागें पुढें पाहिलेंसुद्धां नाहीं.

हीं विरोधी चित्रें पाहण्याची शक्ति माझ्या मनाला राहिली नाहीं. मी अंथरुणावर जाऊन पडलों. परंतु खोलींतील प्रत्येक वस्तु न कळत तिचीच आठवण करून देऊं लागली. काल रात्रीं तिनें केंसांत माळलेलीं अबोलीचीं फुलें अजूनहि टवटवीत दिसत होतीं; पण तिचें जीवनपुष्प मात्र—मी त्याचा चोळामोळा करून टाकला होता !

त्या रात्रीं माझ्या डोळ्याला डोळादेखील लागला नाहीं. मी केलें हें सर्वस्वीं बरोबर नसलें तरी अगदींच चूक होतें असेंहि मला वाटेना. पण बुद्धि आणि हृदय यांच्या द्वंद्वयुद्धांत शेवटीं दुर्बल हृदयाचाच जय होतो. कीर्ति आणि बढती यांचा लाभ करून देणारें तें पुलाचें अवाढव्य काम अर्धवट सोडून मी रजा घेतली आणि मुंबईला निघून आलों.

मुंबईला दहा लाख माणसें आहेत पण मला काय उपयोग होता त्यांचा ? वेड्यासारखा मी मुंबईभर भटकलों. नाटकें पाहिलीं, गाणीं ऐकलीं, पण मनाची तळमळ कांहीं केल्या दूर होईना. मधून मधून असेंसुद्धां वाटे कीं

बायकोचा खून करणारा नवरा म्हणून आपण कोर्टापुढें जाऊन उभें रहावें! पण माझ्या शब्दावर विश्वास कोण ठेवणार होता? माझी पत्नी अपघातानें बुडून मेली अशीच साऱ्या जगाची समजूत. ही समजूत बदलायची कशी!

मला मुंबईला येऊन पांच सहा महिने झाले असतील नसतील. एके दिवशीं मी मलबार हिलवर शून्य दृष्टीनें खालीं पसरलेल्या मुंबईकडे पहात बसलों होतों. ‘ काय रावसाहेब? आहे का गरिबाची आठवण? या प्रश्नानें मी वळून पाहिलें तों कोंकणांत आमच्या घरीं पूजेला येणारा भिक्षुक माझ्या पुढें उभा! कांहींच उत्तर न देतां कपाळाला आंठी घालून मी त्याच्याकडे पाहूं लागलों. पण त्याचें माझ्या चेहऱ्याकडे लक्षच नसावें. तो सांगूं लागला, “ यजमानांच्या इथं लग्न आहे इथल्या एका, म्हणून आलों मी मुंबईला. काय रावसाहेब, दुसरं लग्न केलं कीं नाहीं? काय देवानं केलं! लाखांत नाहीं बाई सांपडणार अशी! देवच कोपला तुमच्यावर. काय करणार त्याला? मूल व्हावं म्हणून किती तळमळत असत वहिनीबाई! अर्चा काय आणि अनुष्ठानं काय? कांहीं म्हटल्या कांहीं कमी केलें नाहीं त्यांनीं. अहो, भर मध्यरात्रीं कुणालाहि न कळूं देतां पिंपळ पुजायचं घोर अनुष्ठान. पण तेंसुद्धां करायला त्यांनीं माघार घेतली नाहीं! द्यायघ्यायलाहि हात मोठा सढळ! अनुष्ठानाला सोनं लागलं आयत्यावेळीं. चटकन् हातांतील आंगठी काढून दिली त्यांनीं मला. अशीं पुण्यवान् माणसं या कलियुगांत— ”

हें बोलणें ऐकण्याकरितां मी पुढें उभासुद्धां राहिलों नाहीं. पुरुषजातीचा अरेरावी स्वभाव, त्यांत पत्नीच्या वर्तनाविषयीं संशय. आगींत तेल पडून भडका उडाला आणि त्यांत माझी प्रियपत्नी दग्ध होऊन गेली. एक मूल व्हावें म्हणून तिनें भलभलतीं अनुष्ठानें केलीं! त्यांचा शेवट पतीकडून तिची हत्या होण्यांत झाला! मनुष्यस्वभाव तरी काय विचित्र! तिच्यावर पांच सहा वर्षे मी प्रेम केलें! पण माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या संशयाचा खुलासा मात्र मी तिला कधींच विचारला नाहीं.

समुद्र! माणसाचं—निदान पुरुषाचं मन समुद्रासारखं असतं हेंच खरं! समुद्र आपल्या पृष्ठभागावर नौकांना विहार करूं देतो. पण त्या नौकांची दिशा थोडी चुकली तर तोच समुद्र अंतरंगांत लपलेल्या खडकांनीं त्यांचा चक्काचूर करून टाकतो. कितीतरी बायकांच्या करुणकथा मला आतां

आठवत आहेत ! पत्नीला निराळें मन असतें हेंच पतीला कळत नाहीं ! कळावें तरी कसें ? नौकेंत भरलेल्या जडजवाहिराची किंमत खड-काला कधीं कळते का ? खडक ! माझ्या अंतःकरणांतल्या त्या खडकावर दीपस्तंभ बांधल्यावांचून माझ्या मनाला शांति मिळणार नाहीं. ज्या द्वारानें मी तिला मृत्यूच्या प्रदेशांत ढकलली त्याच द्वारानें मी तिथें पाऊल टाकणार आहें. माझी आत्महत्या हाच तो दीपस्तंभ !"

"बत्ती ! बत्ती !" हे खलाशांचे शब्द माझ्या कानांवर पडले. मी बाहेर येऊन किनाऱ्याकडे पाहिलें. बोटींच्या सुरक्षितपणासाठीं खडकावर बांधलेली बत्ती अंधारांत लकलक चमकत होती.

"समुद्र आणि माणसाचं मन दोन्हीं सारखींच !" त्या बत्तीकडे पाहतां पाहतां माझ्या मनांत विचार आला.

न कळत माझ्या डोळ्यांतून अश्रू गळूं लागले. समुद्राच्या पाण्यांत पडलेली ही जलांजलि त्या अभागी पतिपत्नींना मिळाली असेल का ?

ज्याच्या ज्याच्या कानावर तो स्वर पडे, त्याचें त्याचें पाऊल जागच्या जागीं थांबे. जणुं कांहीं त्या मधुर स्वरजालांतच तें अडकून पडे.

कुहू !—कुहू !
कुहू !—कुहू !
कुहू !—कुहू !
कुहू !—कुहू !

एखाद्या लताकुंजात उमललेल्या फुलांचा उन्मादक सुगंध दूरवर पसरावा, पण तें फूल मात्र कोणालाच दिसूं नये—तशी त्या मधुर स्वराची स्वामिनी कुठेंच दिसत नव्हती.

ज्याच्या ज्याच्या कानावर हें मधुसंगीत पडे, त्याचें त्याचें हृदय कुठल्या-तरी सुंदर स्मृतीशीं खेळतां खेळतां आकाशात उंच उंच उडे.

कुहू ?—कुहू !
कुहू !—कुहू !
पोळ्यांतून ठिबकणारे मधुबिंदु—
मीलनाकरितां अधीर झालेल्या रमणीच्या मनांतल्या गाण्याच्या ध्रुपदाचे शब्द—
पदराआड लपून स्तनपान करणाऱ्या बालकाचा मधुर हुंकार—
कुंजवनांत कृष्णाची मूक आळवणी करणाऱ्या राधिकेच्या नेत्रांतील नृत्याचा नाद
तो मधुर स्वर ऐकणारांच्या मनांत कल्पनांचा नुसता पाऊस पडत होता.

* * *

आम्रवृक्षाच्या पर्णभारांत लपून बसलेली कोकिळा या दिग्विजयानें धुंद होऊन पंचमांत गाऊं लागली.

कुहू— कुहू—
कुहू—कुहू—कुहू—

आंब्याच्या मोहराकडे पाहून कोकिळेला वाटलें—'आपलें गाणें ऐकूनच या वृक्षाच्या आंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले आहेत.'

फुललेल्या बागेकडे पाहून तिच्या मनांत आलें–' आपलें गाणें ऐकूनच वसंताची कळी उमलली आहे.'

रमणीय उषःकाल पाहून ती स्वतःशीं उद्गारली–' माझ्या गाण्यानें उल्हासित झाल्यामुळेंच उषा इतकी सुंदर दिसत आहे.'

चांदण्या रात्रीं हातांत हात घालून फिरणाऱ्या आणि चवऱ्यांप्रमाणें हालणाऱ्या वृक्षांच्या सावल्यांत एकमेकाचें चुंबन घेणाऱ्या जोडप्यांकडे पाहून कोकिळा म्हणे, ' माझ्या गाण्यानेंच यांच्या हृदयांत प्रीतीचें कारंजें नाचूं लागलें आहे.'

मोहरलेला आम्रवृक्ष, बहरलेला वसंत, उषेची दीप्ति आणि वल्लभ-वल्लभांची प्रीति—हें सारें सौंदर्य आपल्या गोड गळ्यानें निर्माण केलें आहे, या अभिमानानें कोकिळा अंध होऊन गेली.

ती आम्रवृक्षाला म्हणाली, ' मी वठलेल्या झाडावर बसलें तर तो सुद्धां मोहरून जाईल!'

ती वसंताला म्हणाली, ' मी वाळवंटांत गाऊं लागलें तर तिथं सुद्धां नंदनवन निर्माण होईल !'

ती उषेला म्हणाली, ' मी संध्याकाळीं नुसतें कुहू–कुहू केलें तर मावळलेला सूर्य पुन्हा परत येईल !'

ती वल्लभ–वल्लभांना म्हणाली, ' मी जर दूर देशीं गेलें तर तुमचें प्रेमहि माझ्याबरोबर उडून जाईल.'

* * *

वर्षाकाळ आला.

आंब्याचा मोहर अदृश्य झाला.

आभाळांतून मुसळधार पाऊस पडूं लागला.

मेघांच्या पांघरुणांतून उषा कधींतरी बाहेर डोकावून पाही. पण तें क्षणभरच.

चांदणी रात्र विझून गेलेल्या यज्ञकुंडासारखी दिसूं लागली.

कोकिळा पूर्वीप्रमाणें गाण्याचा प्रयत्न करूं लागली. पण तिच्या कंठांतून सूरच बाहेर पडेनात.

* * *

हिंवाळा आला.

सारीं झाडें लक्तरें पांघरलेल्या भिकाऱ्याप्रमाणें दिसूं लागलीं.

शेतकऱ्यानें भात झोडपावें त्याप्रमाणें अंगाला झोंबणारा वारा वृक्ष वेलींचें पान नि पान झोडपून काढीत होता. त्या वाऱ्याला भिऊनच कीं काय उषा अंथरुणांतून लवकर बाहेरच पडेना !

एखाद्या चांदण्या रात्रीं चंद्राला खळें पडे हें निराळेंच. पण प्रत्येक रात्रीं आकाश अश्रु गाळूं लागलें. तें पहायला कोणता वल्लभ आपल्या वल्लभेला घराबाहेर घेऊन येईल ?

माडावर बसून कोकिळा गाण्याचा प्रयत्न करूं लागली.

आपला कंठ सुकल्याचा तिला भास झाला.

अंगांत होतें नव्हतें तें बळ एकवटून ती गाऊं लागली.

तिच्या कंठांतून स्वर बाहेर पडले.

पण—

ते वसंतांतले आम्रवृक्षावरले स्वर नव्हते, ते वसंतांतल्या उषःकालाचे स्वर नव्हते, ते वसंतांतल्या चांदण्या रात्रीचे स्वर नव्हते ! त्या मधुर स्वरांचीं भुतें होतीं तीं !

तिला स्वतःलाच ते स्वर ऐकवेनात !

कोकिळा मुकी झाली. ती मनांतल्या मनांत वसंताला आळवूं लागली, ‘ लवकर ये, माझ्या जिवाच्या राजा, लवकर ये. ’

# जहागीरदारांचा जांवई ८

" भिकू, अरे भिकू उठलास का रे ? " खोलीबाहेरून शब्द ऐकूं आले. भिकाजीपंतांनीं हूं कीं चूंदेखील केलें नाहीं. एक मोठा खटला आपल्याकडे आला आहे, आपण प्रतिपक्षाला चारी मुंडे चीत करण्याइतका पुरावा गोळा केला आहे, आपलें कूळ गयावया करून पांचशें रुपये देत आहे, पण आपण ते फार कमी म्हणून दूर लोटून देत आहों, असें स्वप्न त्यांना पडत होतें. अर्धवट गुंगींत पहांटेचीं स्वप्नें खरीं होतात, या मोहक नियमाची आठवण होऊन त्यांना आनंदाच्या गुदगुदल्याहि होत होत्या. बिचाऱ्याला ठाऊकहि नव्हतें कीं बाहेर पहांट नसून सकाळ होऊन गेली होती. निशेनें आपली मुलगी उषा सूर्याला देतांच त्यानें जावईशाहि गाजवून त्या दोघींनाहि आकाशाच्या घरांतून क्षणार्धांत हांकलून दिलें होतें.

" भिकू अरे भिकू, ऊठ कीं रे. सूर्य बघ किती वर आला आहे तो. " खोलीबाहेरील आवाज आतां दरवाजांत आला पण सूर्याकडे बघायला भिकाजीपंत कवि थोडेच होते ! सूर्यापोटीं शनैश्वर जन्माला आला असला तरी या बापलेकांच्या भांडणामध्यें आपला हात ओला होण्याचा मुळींच संभव नाहीं हें कळण्याइतके ते वकील होते खास ! अंथरुणाचा वहिवाटीचा हक्क आतां सोडून दिला तर तो पुन्हां मिळवायला सबंध दिवस खर्च करावा लागेल असा दूरदर्शीपणाचा विचार करूनच कीं काय, त्यांनीं आईच्या ' उठा उठा हो भिकु बाळ ' या भूपाळीला कांहींच उत्तर दिलें नाहीं. बिचारी आई काय करणार ? मुलगा अगर नवरा राजासारखा वागूं लागला कीं आई व बायको यांच्याकडे बंदीजनांचें काम सहजच येतें. ' भिकू, चहा होईल आतां ' आई खोलींत येत म्हणाली. भिकाजीपंतांच्या झोंपेवर चहास्त्र हेंच ब्रह्मास्त्र होतें. मोठमोठया सभेंत टिळक अगर गांधी यांच्या नामोच्चाराचा जो फायदा होतो तो भिकाजीपंतांच्या बाबतींत ' चहा ' या दोन अक्षरी शब्दानें होत असे. ' देवानं स्वर्गांतली पहिल्या रांगेंतली खुर्ची दिली तरी चहाकारितां इहलोकीं येण्याचा हट्ट धरून बसणार हा भिक्या ! ' असें त्यांचे सहाध्यायी नेहमीं म्हणत असत. आईच्या ' चहा ' शब्दानें झोंपेचा अंमल

थोडासा कमी झालेला दिसला. कारण घोरत पडलेला समाज, जागृति झाली हें दाखविण्याकरितां जशा सभा भरवूं लागतो त्याप्रमाणें त्यांनींहि अंगाला आळेपिळे देऊन हातापायांचें सम्मेलन भरविण्याला सुरुवात केली. पण सभांप्रमाणें त्यांच्या या संमेलनाचें रूपांतर कृतींत होण्याचा मुळींच संभव दिसेना. एका अर्थानें तें बरोबरच होतें. आईनें 'चहा होईल आतां' असें म्हटलें होतें. या वाक्यांतील भविष्यकाळ एका वर्षापूर्वी एल्‌एल्. बी. झालेल्या भिकाजीपंतांना कळणें मुळींच कठीण नव्हतें. आईचा चहा प्रसंगीं इंग्रजसरकारच्या स्वराज्यासारखाच ठरायचा, अशी त्यांना भीति वाटली. 'होईल' या शब्दाऐवजीं 'झाला' हा शब्द तिनें वापरला असता तर अयोध्येचा राज्यावर पाणी सोडणाऱ्या हरिश्चंद्राच्या तडफेनें भिकाजीपंतांनीं पांघरूण दूर झुगारून दिलें असतें, बापासाठीं जन्मभर अविवाहित राहणाऱ्या भीष्माचें स्मरण करून आईकरितां सर्व दिवसभर अनिद्रित राहण्याची प्रतिज्ञा त्यांनीं केली असती, 'का ते कान्ता कस्ते पुत्रः' हा शंकराचार्यांचा बोध मनांत आणून 'उशी कुणाची न् गादी कुणाची, मेल्यावर यांच्यापैकी कोणीहि बरोबर येणार नाहीं' असा पोक्त विचार त्यांनीं केला असता. पण! त्यांची आई पडली जुन्या काळची अशिक्षित स्त्री. भूतकाळ व भविष्यकाळ यांत कालदृष्ट्या थोडें अंतर असलें तरी अर्थदृष्ट्या जमीनअस्मानाचा फरक पडतो, याची तिला कल्पनाच आली नाहीं. घरातले पुरुष लवकर उठावेत म्हणून तरी स्त्रीशिक्षण सर्रास झालें पाहिजे, असें भिकाजीपंतांच्या आईला वाटत नसलें तरी त्याच्या निद्रेचा हा अनावरण-समारंभ पहाणाऱ्या प्रत्येक प्रेक्षकाला खास वाटलें असतें.

भिकाजीपंतांनीं डोळे उघडले खरे; पण डोळे उघडल्याबरोबर चहा दृष्टीला पडला नाहीं म्हणूनच कीं काय ते पुन्हां मिटून घेतले. आईला भीति पडली. ती केविलवाण्या स्वरानें म्हणाली, "आज शनवार आहे ना रे? बापू, शान्ति नि सुशी तुझ्यासाठीं खोळंबलीं आहेत. त्यांना उशीर नाहीं का होणार शाळेला जायला?" मातृप्रेम व भगिनीप्रेम हीं दोन्ही हातांना धरून भिकाजीपंतांना उठवूं लागलीं. कंबरेशीं वरच्या भागाचा काटकोन करून आपण उठलों नाहीं तर बापूला अंगठे धरून तासभर तोच प्रयोग शाळेंत करावा लागेल, ही कल्पना मनात येतांच 'उठलों हं आई'

असे शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडले. पण हुंडा न घेणें, अस्पृश्यांना बरोबरीच्या नात्यानें वागविणें, सर्वांभूतीं परमेश्वर आहे असें मानणें वगैरे गोष्टींप्रमाणेंच अंथरुणावरून एकदम उठणें ही गोष्टहि बोलायला सोपी पण करायला कठीण आहे असें त्यांना आढळून आलें. स्वयंपाकघरांतून 'सात वाजून गेले ग आई' ही बापूची वाणीहि भिकाजीपंतांच्या कानांवर येऊन पडली. आतां कांहीं झालें तरी उठायचेंच, असा त्यांनीं निश्चय केला. 'निश्चयाचें बळ, तुका म्हणे तेंचि फळ' ही अभंगवाणीदेखील त्यांना मनांत आठवली. धांवण्याला प्रारंभ करण्यापूर्वीं हीव भरल्याप्रमाणें मोटारगाडी जशी उडूं लागते, त्याप्रमाणें वकीलसाहेबांनीं पीनलकोडानें पवित्र झालेले आपले हात व कोर्टाची पायरी झिजविणारे आपले पाय हालविण्याला सुरुवात केली. इतक्यांत शान्ती दारांत धांवत धावतच आली व म्हणाली, 'दादा, बाहेर किनई तुमच्याकडे कोणसे आले आहेत.' 'मी घरात नाहीं म्हणून त्यांना सांग' हें उत्तर वकीलसाहेबांच्या जिभेवर आलें होतें; पण 'खोटें कधीं बोलूं नये' या उपदेशापेक्षा शान्तीच्या पुढील शब्दामुळें तें जागच्या जागींच राहिलें. "वकीलसाहेब आहेत का घरांत, म्हणून त्यांनीं विचारलं." शान्तीचे पुढील शब्द ऐकायला भिकाजीपंत अंथरुणांत राहिले होते कुठें? अंगांत भूतसंचार व्हावा त्याप्रमाणें एकदम उठून आई व शान्ती यांच्यामधून ते खोलीबाहेर निघूनहि गेले. 'आपल्या पोराला वेडबिड तर लागलं नाहीं ना' अशी शंका भिकोबांच्या या हनुमंतावतारानें व त्या प्रेमळ मातेला आल्यावांचून राहिली नाहीं. पण धंद्याची ओढ ही अशीच असावयाची असें मानून तिनें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

आंघोळ करीत असतांना गणितांतील कूट प्रश्नाचें उत्तर सांपडल्यामुळें आनंदानें गांवभर धांवत सुटलेल्या ग्रीक पंडिताप्रमाणें भिकाजीपंत धोतराच्या निऱ्या कशा तरी खोंवलेल्या, कांसोटा पोस्टाच्या पेटीच्या तोंडांत अर्धवट अडकलेल्या पत्राप्रमाणें बाहेर डोकावून पहात असलेला, सदऱ्याच्या गुंड्या लावल्या नसल्यामुळें त्याचें पारडें डाव्या बाजूला झुकलेलें, तोंड धुतलें नसल्यामुळें न विसळलेल्या चहाच्या बशीप्रमाणें दिसत असलेलें, अशा थाटांत दरवाजाकडे लगबगीनें आले. 'वकीलसाहेब आहेत का घरांत?' म्हणून विचारणारा प्राणी खास अशीलच असला पाहिजे, आजच्या पहाटेचें

स्वप्न खरें ठरण्याचा रंग दिसत आहे, असे विचार करीत स्वारी दारापाशीं आली. आजचें कुळ एखादा बडा जमीनदार असेल तर काय बहार होईल, हें त्यांचें मनोराज्य दारांत उभ्या असलेल्या जॉन शिंप्याकडे पहातांच तोंडांत टाकलेल्या गारेप्रमाणें एकदम वितळून गेलें. जॉनच्या चेहऱ्याकडे पहाण्याचेंदेखील त्यांना धैर्य होईना.

" साब, आमचा पैसा ? " जॉननें प्रश्न केला.

" देऊं या. लवकरच देऊं या. "

" देऊं या काय, साब ? आज पहिली तारीख. तुमच्यासारख्या वकीलांनीं हात आखडून धरला तर आमच्यासारख्या शिंप्यांचं पोट कसं चालायचं, साब?"

माझ्या वकिलीच्या पाटीची किंमत तुझ्या शिवण्याच्या यंत्राइतकीदेखील नाहीं, तुझ्याप्रमाणें गळे कापून पैसे मिळविण्याचाच माझा धंदा असला तरी मला त्यांत अजून पैदेखील मिळत नाहीं, असें स्पष्टपणें जॉनला सांगण्याची भिकाजीपंतांना छातीच तव्हती. ते म्हणाले, " जॉन, तुम्ही शिंपी कुठं वेळेवर कपडे देतां ? त्यांतलेच आमचे पैसे ! "

आपल्या धंद्याची निंदा या जगांत कुणाला आवडते ? जॉन जरा रागानेंच म्हणाला, " साब, तुम्हीं घालतां सूट आणि आम्हाला येते तूट ! "

" वा: बरंच बोलायला शिकला आहेस कीं रे तूं. मुंबईला शिवणकामाबरोबर हेहि शिकवितात वाटतं ? वकील कसा छान झाला असतास ! "

" कशाला ? शिंप्यांच्या पोटांना चिमटा घ्यायला ? " जॉन फणकाऱ्यानें म्हणाला. आंब्याची वाळलेली कोय चोखून रस मिळणें जितकें शक्य, तितकाच वकीलसाहेबाकडून आज पैसे मिळण्याचा संभव अशी त्याची खात्री झाली होती. भिकाजीपंतांच्याकडे पाठ फिरवून तो जायला निघाला. जातां जातां " परवां सकाळीं पैसे तयार ठेवा हं; नाहींतर आम्हांला फिर्याद करायची पाळी येईल. " असें बोलायला तो चुकला नाहीं.

खिन्न अंतःकरणानें भिकोबा घरांत परत आले. आपल्यावर जॉन जी फिर्याद करणार तिचें वकीलपत्र आपल्याला मिळालें तर फार बरें होईल अशी असंबद्ध कल्पनादेखील त्यांच्या मनांत चमकून गेली. चूल भरून स्वयंपाकघरांत ते पाटावर बसले. बापू, शांती व सुशी चहा पिऊन शाळेला जायच्या तयारींत होतीं. मुलांची आगगाडी सुटायला आपल्यामुळेंच उशी

झाला असें वाटून भिकोबा म्हणाले, 'उशीर होईल ना रे तुम्हांला ? आमच्या वेळीं बोवा–' बापू मध्येंच म्हणाला, "आज पहिली तारीख. फी पाहिजे आम्हांला." भिकाजीपंतांनाच जर कुणी फी देत नव्हतें तर ते तरी मुलांना कुठून फी देणार ? त्यांनीं हळूच आईकडे पाहिलें. बाह्यतः ती त्यांच्या पेल्यांत चहा ओतीत होती; पण तिचें सारें लक्ष वडील भाऊ व बापू यांच्या संवादांत होतें. "सोमवारीं फी देईन म्हणून सांगा" वकिलांनीं भावंडांना सल्ला दिला. जत्रेंत हिंडणाऱ्या भिकाऱ्याच्या मुलांप्रमाणें खिन्न व निराश चेहरे करून मुलें मंद पावलें टाकीत निघून गेलीं. चहाचे दोन घोट घेतांच भिकोबा म्हणाले, "चहांत दूध अगदींच कमी दिसतंय ग आई!"

"पाण्याप्रमाणं दुधाच्या विहिरी असत्या तर–" पुढें आईला बोलवेना. तिच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. त्या अश्रूंमुळें आधींच कडवट असणारा चहा भिकोबांना अधिकच कडू लागूं लागला. कांहीं तरी बोलायचें म्हणून ते म्हणाले, "अशी धीर सोडूं नकोस आई. हेहि दिवस निघून जातील."

आशावाद चांगला खरा पण त्यालाहि कांहीं मर्यादा असतेच. घरचें उत्पन्न सारें शेंशंभर रुपयांचें. भिकू इंग्रजी सहावींत असतांनाच आकाशींच्या कुऱ्हाडीनें सौभाग्यवृक्ष छिन्न करून टाकलेला. पण आशेच्या अंगीं दहा हजार हत्तींचें बळ असतें असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. भिकू व त्याच्याहून लहान असलेलीं तीन मुलें या सर्वांचें पालन पोषण गेलीं सात आठ वर्षें या माउलीनें हंसत खेळत केलें होतें. भिकूच्या आयुष्याची माती होऊं नये म्हणून अंगावरील सोन्याची गुंज नि गुंज विकून तिनें त्याला एल्एल्. बी. केलें होतें. बी. ए. झाल्यावर मास्तराची नोकरी धरून त्यानें प्रपंच चालवावा असें फार फार तिच्या मनांत होतें. पण मास्तरकीच्या बैलगाडीपेक्षां वकिलीच्या विमानांत बसूनच आयुष्याचा प्रवास करण्याचें भिकोबांनीं ठरविल्यामुळें तिचाहि नाइलाज झाला. शिवाय वकिली हा कल्पवृक्ष असतो हें तिनें गांवांतल्या गांवांतच पाहिलें होतें. लहानपणीं उलटी अंबारी धरणारा मनुष्य वकिलीनें हात दिला म्हणजे मोठेपणीं खऱ्या अंबारींतून बसून मिरवूं लागतो. खरी चांदी सोडून जर्मन सिल्व्हरच्या नादाला लागणें शहाणपणाचें नव्हे असें वाटून भिकोबा बी. ए. झाल्यानंतरहि तिनें जिवापाड कष्ट करून संसाराचा गाडा दोन वर्षें हांकला. या दोन वर्षांनंतर भिकोबाच्या घरांत एक

मोठेंच स्थित्यंतर घडून आलें. तें स्थित्यंतर म्हणजे त्यांच्या भिंतीवर झळकूं लागलेली ' भिकाजी रावजी काजरेकर, बी. ए, एल्‌एल्‌. बी. वकील, सावंतवाडी ' ही पाटी होय. लहानपणीं पहिल्यांदा वडिलांनीं नवी साडी घेतली त्यावेळचा आनंद आणि लग्नानंतर नवऱ्यानें मोठ्या आवडीनें नवी नथ केली त्यावेळचा उल्हास या दोन्हींचें मिश्रण त्या पाटीकडे पहातांना भिकोबाच्या आईच्या अनुभवाला येत असे. संध्याकाळीं ब्राह्मण—देवाला जाऊन परत येतांना अंगणांत उभी राहून क्षणभर ती या पाटीकडे पाही व नंतर सोप्याच्या पायऱ्या चढे.

पण पाटींतली ही जादू दिवसामागून दिवस जाऊं लागले तशी ओसरूं लागली. लाकडावर काढलेल्या चित्रातलें डाळिंब खरें वाटून त्याच्यावर पोपट सारखी चोंच मारूं लागला कीं त्याची चोंचच दुखूं लागते. भिकाजीपंतांच्या वकिलीचाहि आईला असाच अनुभव येऊं लागला. कचेरींत जाताना त्यांचा कोट जेवढा हलका लागे तेवढाच कचेरींतून आल्यावरहि लागे. आडांतच नाहीं तर पोहऱ्यात कुठून येणार, हें लक्षांत घेऊन आई मुलाच्या कोटाच्या मुक्या खिशांना कधींहि दूषण देत नसे. पक्षकारांच्या दृष्टीनें सकाळहि अशीच वांझ जात असे. बुडितखर्च करून भिकाजीपंतानीं एक टेबल विकत घेतलें होतें व त्याच्यावर अनेक ' कोडीं ' रचून ठेविलीं होतीं. त्यांच्याकडे एकाग्र दृष्टीनें पाहूनही कुळें पैदा कशीं करावयाचीं हें कोडें त्यांना कधींच सुटत नसे. आपल्या दिवाणखान्यांतल्या खुर्च्यांची स्थिति आजन्म कुमारिका रहावें लागणाऱ्या मुलीसारखी झालेली पाहून वकिलांना अगदीं भडभडून येई. पण त्यांच्या त्या तीन चार कन्यकांपैकीं एकीलाहि नवरा मिळण्याचा योग येईना. सकाळीं दाराबाहेर थोडासा गलबला ऐकूं आला कीं कुणी पक्षकारच आपल्याकडे येत आहे असें वाटून भिकोबा टेबलावरील कागद इकडेतिकडे पसरून एखाद्या लठ्ठ पुस्तकांत डोकें खुपसून बसत असत. पण या नाटकापासून सहसा कांहींच फलप्राप्ति होत नसे; कारण तें पहायलाच कुणी येत नसे. आपल्या वकिलीच्या दिवाणखान्यांतील स्मशानतुल्य शांतता वकीलसाहेबांना असह्य होई. या स्मशानांत आपण दिगंबर शंकराप्रमाणें जन्मभर बसणार कीं काय अशी त्याना भीति वाटूं लागे, त्या दिगंबर शंकराभोंवतीं नाचायला भुताचा मेळा तरी असतो;

तेवढेंदेखील आपल्याला भाग्य नाहीं. भुतें जमवायला लागणारीं शितें तरी आपल्यापाशीं कोठें आहेत, हा विचार मनांत आला कीं भिकोबाचें डोकें अगदीं सुन्न होऊन जात असे. लहानपणापासून अभ्यासाकरितां रक्ताचें पाणी केलें; पण या पाण्यांतून लक्ष्मीचा जन्म होण्याचा संभव दिसेना. वकिलीच्या मृगजळामागें धांपा टाकीत असेच जन्मभर धांवत रहायचें व एक दिवस उरीं फुटून मरायचें, एवढ्यासाठींच आपण जन्माला आलों आहों काय !

किराइताचा काढा घेत असल्याप्रमाणें चेहरा करीत भिकोबांनीं चहापान संपविलें. आई हळूंच म्हणाली, " गवळी पैसे मागत होता मघाशीं. आज पहिली तारीख ! " या पहिल्या तारखेसारखा नष्ट दिवस साऱ्या जगांत नसेल असें भिकोबांना वाटलें. या धोंड्या दिवसाचा उल्लेख मघाशीं शिप्यानें केला; नंतर बापूनें त्याचेंच नांव घेतलें; आतां गवळीहि त्याच्याकडेच बोट दाखवीत आहे. सारें जग ' पहिली तारीख की जय ' म्हणत आहे. पण आपल्याला ह्या पहिल्या तारखेचा उपयोग काय ? वठलेल्या झाडावर कांहीं वसंताच्या आगमनानें पालवी फुटत नाहीं.

" असंच किती दिवस चालायचं रे भिकू ? " दाटून आलेल्या गळ्यानें आईनें विचारलें.

" जातील ग, हेहि दिवस जातील. "

" दिवस बाबा कुणाकरितां राहिले आहेत ? दिवस घोड्यासारखे जात असतात. " त्या माउलीला पुढें बोलवेना; पण या घोड्यावर बसून मिरवत जाण्याऱ्या ऐवजी आपण त्यांच्या लाथा खात फरफटत जात आहों याची जाणीव तिच्या मुद्रेवर स्पष्टपणें दिसत होती. भिकोबांना आईचें समाधान कसें करावयाचें तें कळेना. ते आधींच मुखदुर्बळ होते. त्यातून खिशांत पैहि नसल्यामुळें त्यांना तोंड उघडण्याची जवळ जवळ चोरीच झाली होती असें म्हणावयाला हरकत नाहीं.

" बाळ, कशाला हवी आपल्याला वकिली न् फिकिली ? एकीनं गळाभर सरी घातली म्हणून दुसरीनं दोरी आवळून घेणं बरं नाहीं. "

" असं कसं म्हणतस आई ? अग चार दिवस सुनेचे, चार दिवस सासूचे असं चालायचंच जगांत. "

" सासूच्या जाचांतून जगली तर सून पुढले दिवस पहाणार ! "

भिकोबांना पुढें काय बोलावें तें सुचेना. आई म्हणाली, " माठेवाड्यांतला रामभाऊ तुझ्याबरोबरचा. मास्तर होऊन आज दोन वर्षें साठ रुपये मिळवितो कीं नाहीं ? " रामभाऊंचा उल्लेख आईनें करतांच भिकोबाचें मन आंतल्या आंत जळूं लागलें. मॅट्रिकच्या वर्गांत या रामभाऊचें गणित आपण घरीं तयार करून घेतलें म्हणून तो सुटला; नाहींतर किती वर्षें कुचंबत पडला असता ! परीक्षेच्या निकालांत तिसऱ्या वर्गाच्या मेंढरांत स्वारीचें नांव नेहमीं दिसायचें ! त्याच रामभाऊनें दरमहा साठ रुपये मिळवावे आणि आपण—भिकोबांना आपल्या मिळकतीची कल्पना करणेंच कठीण वाटूं लागलें. शून्यदृष्टीनें ते आढ्याकडे पाहूं लागले.

" त्याच्यासारखा मास्तर झालास तर नाहीं का सुख लागणार ? "

वकिलानें मास्तर व्हायचें ! छेः छेः छेः ! केवढा हा अधःपात ! एक वेळ उपाशीं सिंह गवत खाईल, भुकेलेला गरुड चिमणीप्रमाणें जमिनीवरील दाणे टिपून क्षुधा शान्त करील, नारळाचें झाड पाण्याला स्पर्श करण्याकरितां आपली मान वांकवील, पण आपणासारखा वकील मास्तर होणार नाहीं. पंचमहाभूतांना साक्षी ठेवून वकिलीचें पाणिग्रहण केल्यानंतर तिला सोडून देऊन मास्तरकीशीं लग्न लावणें कुणाहि आर्याला शोभणार नाहीं, अशा आशयाचें भाषण आईपुढें करण्याचा विचार भिकोबांच्या मनांत उद्भवला. पण दारिद्र्याच्या इतर मनोरथांप्रमाणें या विचाराचीहि वासलात लागली. ते मोठ्या कष्टानें म्हणाले, " अमृत मिळण्याकरतां देवांना किती कष्ट करावे लागले ही कथा तुला ठाऊक आहे ना ? " या पौराणिक दाखल्यानें भरून येण्याइतकी आईच्या हृदयाची जखम साधी नव्हती. ती म्हणाली, " बाळ, आपलं घरचं उत्पन्न सारं शेंशंभर रुपयांचं. तूं तर महिना दहावीस रुपयेदेखील घरांत आणीत नाहींस. द्रौपदीप्रमाणें एखादी स्थाली जर आपल्याला मिळाली असती—"

भिकोबांना काय स्फूर्ति झाली कुणाला ठाऊक ! ते एकदम म्हणाले, " मी घरांत दहावीस रुपये देतों म्हणून तेवढेच मला मिळतात असं तुला वाटतं कीं काय ? अग, बाकीचे पैसे मी शिल्लक टाकतों आहे. "

आई डोळे फाडफाडून भिकोबांच्याकडे पाहूं लागली. "भिकू तूं माझ्यापासून असं कांहीं चोरून ठेवशील—"

भिकोबा हंसण्याचा आव आणून उत्तरले, "चोरी अशी नाहीं ग. पण वकिलीच्या एका वर्षांत मी हजार रुपये तरी शिल्लक टाकले आहेत. बॅरिस्टरीला जावंसं वाटलं तर हातांत पैसा असलेला बरा."

"तुझी बॅरिस्टरी लांब राहिली. उद्यां सून आणायची म्हटलं कीं वकिलिणीला शोभतील असे दागिने नकोत का करायला?"

"हो, तेंहि खरं." भिकोबा जरा जड स्वरानें म्हणाले.

"परवांच ते रामभटजी विचारीत होते आपल्या मुलीविषयीं. ज्येष्ठांतला मुहूर्त धरला नाहीं तरी ठरवून टाकूं या असं म्हणाले."

भिकोबांचें वकिली रक्त तापून गेलें. दुःशासनाचें नरडें फोडणाऱ्या भीमसेनाच्या आवेशानें ते म्हणाले, "आई, हा भिकोबा एखाद्या भटुरग्याचा जांवई होण्याकरितां जन्माला आला नाहीं हं. ही शनीची साडेसाती संपूं दे, सहा महिन्यांनीं जहागीरदारांच्या मुली मला सांगून येतील, बघ. वकिलाचा सासरा कोण? तर म्हणे भिक्षुक. आम्ही पगडी घालून बारा वाजतां कोर्टांत जायला निघावं तों श्वशुरांची स्वारी कुणाचं तरी तेरावं आटपून बोडक्यानंच रस्त्यांत भेटायची! तो जॉननं शिवलेला सूट घालून आम्ही वकीलमंडळींतून फिरायला जावं आणि सत्यनारायणाकरितां निघालेल्या पंचेवाल्या मेव्हण्यांनीं रस्त्यांत आमचं स्वागत करावं! खासा न्याय! आज मला रामभटजींची मुलगी करून घ्यायला सांगते आहेस! उद्यां एखाद्या खाणावळवाल्याची कारटी करायला सांगशील; पिकतं तिथं विकत नाहीं असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं."

"अशी डोक्यांत राख घालूं नकोस बाबा. रामभट म्हणाले तें मी आपलं तुला सांगितलं. हजार हजार रुपये तुझी शिल्लक पडूं लागली तर मी तरी भटाभिक्षुकाची मुलगी तुझ्या गळ्यांत कशाला बांधीन? मी त्या दिवशींच अर्धवट नकार दिला आहे रामभटांना. ते म्हाडदळला गेले आहेत. आज परत आले म्हणजे साफ सांगेन कीं आमचा भिकू आतां असा तसा राहिलेला नाहीं. एका वर्षांत त्यानं हजार रुपये शिल्लक टाकले आहेत. तुमच्या लहान तोंडीं आमचा मोठा घांस कांहीं मावायचा नाहीं."

आईच्या आज्ञेवरून भाजी आणण्याकरितां भिकोबा बाहेर पडले. पण तोंडानें हजार रुपये शिल्लक टाकणाऱ्या वकीलसाहेबांच्या हाताला खिशांत एक पैसाहि लागेना. लागणार तरी कुठून ? चवलीचें पावल्याशीं लग्न लावून महिने झाले तरी सहा आण्यांपलीकडे त्यांची वाढ होत नाहीं हें त्यांनीं अनुभवलें होतें. काल संध्याकाळीं लायब्ररींतून परत येतांना चहा घ्यावासा वाटल्यामुळें ते दुकानांत गेले होते. दुकानांतल्या आसनावर विराजमान झाल्यानंतर त्यांनीं खिशांत हात घालून पाहिला तों अवघा एकच पैसा हाताला लागला. लगेच चहाची ऑर्डर फिरवून ते म्हणाले, " सिंगल द्या हो वामनराव, डबल नको. तुझं माझं पटेना नि तुझ्यावांचून गमेना अशी या चहाची मैत्री आहे. "

पलीकडच्या बांकावर शंकरपाळीं व भजीं यांचा यथास्थित समाचार घेत असलेले एक मोटारड्रायव्हर म्हणाले, " असा हात आंखडता कां घेतां वकीलसाहेब ! "

ड्रायव्हरला अंतर्ज्ञान असतें तर वकीलसाहेबांच्या खिशाची अंतःस्थिति त्याला सहज कळली असती.

रात्रीं अंथरुणावर भिकोबा किती तरी वेळ त्या ड्रायव्हरची व आपली तुलना करीत पडले होते. आपण तेरा वर्षें इंग्रजी शिक्षण घेऊन चहाच्या पेल्याला महाग झालों; उलट इंग्रजीचा गंधहि नसलेला एक मनुष्य मोटार चालवून उत्तम रीतीनें आपलें पोट भरीत आहे. मिळकत कमी असली तरी आपल्या हातून लोकांचें कांहीं काम होत आहे म्हणावें तर तेंहि नाहीं. घरीं जेवायचें अन् कोर्टांत जाऊन माशा मारीत बसायचें. भिकोबांनीं खूप खूप विचार केला; पण विचारांनीं डोकें पिकलें तरी त्या पिकापासून पैचीहि प्राप्ति होत नाहीं हा अनुभव नेहमींप्रमाणें त्यांना आला. झोंप लागल्यावर त्यांना स्वप्नें मात्र फार चांगलीं पडलीं. आपल्या वकिलीच्या जाळ्यांत साधे मासेच नव्हेत तर देवमासेहि अडकले आहेत, सुंदरवाडीचें सौंदर्य म्हणतां येईल असा बंगला आपण बांधला आहे, चहाच्या दुकानांत आपण सिंगल पीत असतांना शंकरपाळीं व भजीं यांच्यावर ताव मारणारा उर्मट ड्रायव्हर आपल्या पायां पडत असून स्वतःवरील एका खटल्यांत आपण वकीलपत्र घ्यावें अशी आपल्याला विनंति करीत आहे. बाटावरल्या एका जहागिर-

दारांची मुलगी आपल्याला सांगून आली आहे—जन्मभर स्वप्नेंच पडत रहावींत असें त्या वेळीं भिकोबांना वाटलें.

पण बाल्य व प्रौढ वय यांच्याइतकाच फरक स्वप्न व जागृति यांत असतो. बाजारांत भाजी पाहिजे तर स्वप्नांतला बंगला गहाण टाकून अगर मोटार विकूनहि ती मिळणार नाहीं हें भिकोबा ओळखून होते. कपडे करून ते भाजी आणावयाला निघाले खरे. पण भाजीला पैसे कुठून आणावयाचे हेंच त्यांना कळेना. विचाराच्या तंद्रींत ते मोतीतलावापाशीं आले तोंच त्यांना एका पठाणानें हटकलें. पठाण लोक अलीकडे सावंतवाडींत सावकारीचा व्यवहार करीत असल्याचें त्यांनीं ऐकिलें होतें. त्या व्यवहारापैकीं एखादी फिर्याद या पठाणाला करायची असेल असा विचार करून ते मोठ्या उत्सुकतेनें त्याच्याशीं बोलूं लागले. "काय रावसाहेब, कांहीं मोतीबिती घेतेय्?" हा प्रश्न ऐकतांच भिकोबांची उत्सुकता प्रतिपदेच्या चंद्रकोरीप्रमाणें तात्काळ मावळली. "मोती घ्यायला आम्हीं कांहीं सावकार नाहीं." ते म्हणाले.

"सावकार नसेल तुम्हीं, वकीलसाब तर हात! वकीलाचें नख नि सावकाराचें मुख, अशी म्हणणीच आहे ना रावसाहेब? अस्सल पाणीदार मोत्यें हात रावसाहेब. आपल्या कानाला भिगबाळी कशी छान शोभेल."

पठाणाच्या तडाक्यांतून जीव बचावण्याकरतां भिकोबा जवळजवळ पळतच सुटले. तळावर लांकडाचे 'भारे' घेऊन येणारीं माणसें त्यांनीं पाहिलीं. निढळाच्या घामानें पोट भरणारीं हीं माणसें देखील आपल्यापेक्षां सुखी आहेत असें त्यांना वाटलें. समाज फिर्यादीवांचून जगेल; पण लांकडावांचून त्याला एक दिवसहि काढतां येणार नाहीं. तसें पाहिलें तर आपला समाजाला काय उपयोग आहे? पलीकडे रिकामा असलेला मोतीतलाव व आपण यांची किंमत सारखीच. पैसे मिळविणारा वकील भरलेल्या मोतीतलावाप्रमाणें समाजाला शोभत तरी असेल. पण मिजास राजाची न् मिळकत डोंबाऱ्याची, अशी आपली स्थिति झाली आहे.

भिकोबांना आठनऊ वर्षांपूर्वींच्या गोष्टी आठवूं लागल्या. याच तळावरून शाळेंत जातांना आपण हजारों तऱ्हेचीं मनोराज्यें करीत होतों. त्यांतलें वकील होण्याचें एक राज्य तेवढें आपल्या पदरांत पडलें, पण आपण वकील

झालें हा वेडेपणाच नाहीं का केला ? पेपरांत मार्कांची बेरीज करायला मास्तर चुकले असले तरी ती चूक त्यांच्या नजरेला आणण्याचें धैर्य कधीं आपल्याला झालें नाहीं; बक्षीस घ्यायला जातांनाच आपले पाय लटलट कापूं लागले, खोटी गोष्ट बनवून सांगण्याची कला तर आपल्याला कधींच साध्य झाली नाहीं. मेंढरामागून मेंढरूं जातें त्याप्रमाणें आपल्या बरोबरीचे लोक एल्एल्. बी. कडे जातात म्हणून आपणहि त्याच मार्गाला लागलों. पण एकाचें औषध तें दुसऱ्याचें विष होतें हाच अनुभव आपल्याला येत आहे. 'वकीलसाहेब' या संबोधनाचा आनंद पहिले चार दिवस झाला तितकाच ! आतां तेंच संबोधन शिवीसारखें वाटूं लागेल कीं काय अशी भीति पडली आहे. वकिली सोडून मास्तरकी करायची म्हणजे अत्तरें विकलीं तिथें घासलेट विकीत बसण्यासारखें होईल. कोतवाली घोड्यानें उपाशी मरायची पाळी आली तरी डोंबाऱ्याचें तट्टू होऊं नये. देव कांहीं आपल्याला असेंच सोडणार नाहीं. आपलें अजून लग्न व्हायचें आहे. कुबेराला विकत घेणारा सासरा आपल्याला भेटला तर आपल्याला काय कमी आहे ? 'पुरुषस्य भाग्यं' हा अनुभव कांहीं खोटा नाहीं.

लग्नाचे विचार डोक्यांत घोळूं लागतांच भिकोबांची कळी उमलली. आपल्या ब्राह्मण समाजांत तरी इतके शिकलेले लोक फारच थोडे ! इकडल्या भटभिक्षुकाची पोर आपण करायची म्हणजे शालूला पासोडीचें ठिगळ जोडण्यांतलाच प्रकार व्हायचा. आपणांला वकिलीनें हात दिला नाहीं तरी अर्धांगी खास देईल. देशावरला कुणीहि गरजवंत बाप आपला शोध काढीत येईल. गरजवंतांना अक्कल नसते आणि सासऱ्याला अक्कल नसणें हें जांवयाच्या दृष्टीनें हितावहच असतें. आपली वकिली फार उत्तम चालली आहे, हजारों रुपये हुंडा देऊन आपल्याला मुली सांगून येत आहेत, तुमची मुलगी करायची म्हणजे तुमच्यावर कृपा करायची असें आपण आपल्या भावी सासऱ्याला भासवूं. केतकीसारखा रंग, चांफेकळीसारखें नाक, हरिणासारखे डोळे असतील तरच तुमची मुलगी आम्हीं पसंत करूं, असें आपण त्या गरजवंत सासऱ्याला स्पष्ट बजावूं. पण हरिणासारखे डोळे कसे ओळखायचे हें भिकोबांना तत्काळ कोडें पडलें. त्यांनीं हरिणाचें चित्र पाहिलें होतें. त्यावरून हरिणाचे डोळे इतर प्राण्यां-

प्रमाणेंच असतात अशी त्यांची ठाम समजूत झाली होती. मघाशीं पठाणानें खोटीं मोत्यें आपणांला दाखविलीं असतीं तरी तीं खरीं का खोटीं हें जसें आपणांला सांगतां आलें नसतें, त्याप्रमाणें कावळ्याचे डोळे व हरिणाचे डोळे यांच्यांतील फरक आपल्याला कळणें अशक्य आहे, हें भिकोबांनीं ओळखलें. ' कांहीं का असेना, मुलगी अप्सरा असली म्हणजे झालें ' हा विचार त्यांच्या मनांत यायला व त्यांच्या उजव्या पायाच्या अंगठ्याजवळच्या बोटाला ठेंच लागायला एकच गांठ पडली. अप्सरेला स्वर्गांतल्या स्वर्गांत सोडून ते पृथ्वीवर उतरले. हजारों रुपये हुंड्याच्या गोष्टी बाजूला ठेवून भाजीकरतां चार पैसे कुठून मिळवायचे या प्रश्नाचा विचार करणें त्यांना प्राप्त होतें. माळेवाड्यांतील रामभाऊ याच वेळीं रस्त्यानें जातांना त्याना दिसले.

" नमस्कार, रामभाऊ, कसं काय, ठीक आहे ? "

" हो, तुमच्या कृपेनं ठीक आहे ! "

" आमची कसली गरीबाची कृपा ! "

" वकील न गरीब हे शब्द एकमेकांजवळ शोभतच नाहींत, भिकाजीपंत. " बिचारे भिकाजीपंत काय उत्तर देणार ? खिशाप्रमाणें आपलें डोकेंहि रिकामें झालें आहे असें त्यांना वाटूं लागलें.

" काय वकीलसाहेब, लग्नाचे लाडू केव्हां देणार ? "

वकीलसाहेब भाजीकरतां रामभाऊंकडे चार पैसे उसने कसे मागावे याचा विचार करीत होते. रामभाऊंनींच आपलें भाषण पुढें सुरू केलें—

" अहो संसाराला खटलं म्हणतातच ना ! कोर्टांतला खटला जसा वादीप्रतिवादींवांचून चालत नाहीं, त्याप्रमाणं संसारहि नवराबायकोवांचून चालत नाहीं. "

" खरं आहे. ' गृहिणी सचिवः सखी मिथः ' असं कालिदासानं म्हटलं आहेच ! "

वकीलसाहेब मनांतल्या मनांत कालिदासाच्या राजाश्रयाचा हेवा करीत होते. श्रीमंत सासरा मिळाल्यामुळेंच कालिदासानें बायकोची इतकी स्तुति केली असावी असाहि पुसट संशय त्यांना आला.

" बघा बोवा, द्या बार लवकरच उडवून. तिकडे वकिलीचा बार आहेच; इकडे हा बार. " रामभाऊंच्या बारांपुढें भिकाजीपंत गर्भगळित होऊन गेले.

" हें बघा रामभाऊ " तें वांचरत म्हणाले.

" काय ? " मास्तरांनीं प्रश्न केला.

" चार पैसे द्या मला. " हें वाक्य मोठ्या कष्टानें हृदयांतून गळ्यापर्यंत आलें व तेथून कसेंबसें जिभेवर चढलें. पुढें मात्र त्याची गति जाईना.

" काय म्हणत होतां हो ? " रामभाऊंनीं पुन्हां विचारलें.

" लग्न म्हणजे जन्माचा प्रश्न. जरा विचारानेंच तो सोडविला पाहिजे."

" हो, नाहींतर मोतीं काढायला समुद्रांत बुडावं न् सुसर हाताला लागायची, असला प्रकार व्हायचा. परवां वैशाखांत माझ्या मावसभावाचं लग्न झालं. काय फसगंमत झाली म्हणतां त्याची. मुलगी लंगडी आहे हें बेट्याला समजूंच दिलं नाहीं त्या लोकांनीं. लग्नाच्या वेळीं पहातों तों ती आपली एका पायावर तयार ! "

" खरंच. " असें म्हणून वकीलसाहेब पुन्हां स्तब्ध राहिले. रामभाऊंनींहि ' येतों ' म्हणून नमस्कार करून रस्ता सुधारला. ते पांचदहा पावलें गेले असतील नसतील तोंच वकीलसाहेब ओरडले, " रामभाऊ, अहो रामभाऊ " वकीलसाहेबांचा तो घोगरा आवाज ऐकून रामभाऊ दचकले. सापबिप तर यांना दिसला नाहीं ना, अशी शंका त्यांच्या मनात आली. ते लगबगीनेंच भिकाजीपंतांच्याजवळ आले व म्हणतात, " काय हो भिकाजीपंत ? "

खिशांत पुनःपुन्हा हात घालीत भिकोबा म्हणाले, " काय विसराळू झालों आहें हो मी अलीकडे. बाजारांत भाजी म्हणून आणायला आलों न् पैशाचं पाकीटच घरीं विसरलों. शाळेंत बोवा असा कांहीं विसराळू नव्हतों मी. जेवायला जायचं न् तोंड विसरून यायचं, अशांतलाच प्रकार झाला हा. आतां भैलाचा हेलपाटा घेऊन घरीं पैसे अणायला जायचं जिवावर आलं आहे. बरं, भाजीवालीला माझ्या वकिलीच्या गोष्टी सांगून काय उपयोग?"

रामभाऊंनीं मुकाट्यानें आपलें पाकीट उघडलें दोन व आणेल्या भिकाजीपंतांच्या हातावर ठेवल्या, भिकाजीपंतानीं सहास्य मुद्रेनें त्यांचा स्वीकार केला. रामभाऊंची पाठ वळतांच आपण पाकीट हरवल्याचें नाटक इतकें बिनचूक कसें करूं शकलों याचें त्यांचें त्यांनाच आश्चर्य वाटलें. वकील हा सर्वोत्कृष्ट नट असतो हें त्यांच्या लक्षांतच आलें नाहीं.

भाजी घेऊन घरीं परत येत असताना भिकाजीपंतांच्या मनोरूपी न्याया-

सनासमोर एका महत्त्वाच्या कज्जाची सुनावणी चालली होती. चार पैसे विरुद्ध एक हजार रुपये ! आई आपल्याला मास्तर होण्याचा आग्रह करणार असें पाहून आपण एका वर्षांत एक हजार रुपये शिल्लक टाकल्याची तिला थाप मारली ! पण आज दुपारची भाजी विकत आणण्याइतके तांब्याचे पैसेदेखील आपल्या खिशांत शिल्लक नव्हते. आईशीं आपण अशी प्रतारणा कां केली ? ती आपल्या बऱ्याकरितांच मला मास्तर व्हायला सांगत नाहीं काय ? वकिलीला सोनें लागलें आहे, या समजुतीनें आपण त्या धंद्यांत शिरलों; पण आपल्या हाताला त्या सोन्याचे कणदेखील मिळत नाहींत. मग मानापमानाच्या खोट्या कल्पना उराशीं बाळगून याच धंद्यांत कुचंबत पडायचें व आपल्या जन्माची माती करून घ्यायची यांत फायदा काय ? आपल्याभोंवतीं किराण्या मालाचीं दुकानें घालून बसलेले हे लोक सुखानें गुजराण करीत आहेत. रस्त्यावरील चांभाराचें दुकान तर उत्तम चाललें आहे. हे सारे लोक अशिक्षित असूनहि सुखी होऊं शकतात आणि आपण पदव्यांची झूल पांघरूनहि निरुपयोगी होत आहों. दारिद्र्य मनुष्य पातकी करतें यांत संशय नाहीं. तसें नसतें तर जन्म देणाऱ्या आईशीं खोटें बोलण्याचा मोह आपणांला कां झाला असता ? वकिलाला शोभेल असा सूट आपण जॉनकडून करून घेतला. पण त्याचे पैसे वेळेवर देण्याचें त्राण आपल्या अंगीं नाहीं. शाळेंत मास्तरांनीं 'फी आणलीत का ?' म्हणून विचारलें कीं आपल्या भावंडांना खालीं मान घालण्याखेरीज गत्यंतर नाहीं. गवळी येऊन पैशाकरितां दारांत धरणें धरून बसला, तर बिचाऱ्या आईनें तरी काय स्वतःच्या कातड्याचे पैसे करून द्यायचे ? गवळ्याला पैसे मिळाले नाहींत कीं त्यानें दूध बंद केलेंच म्हणून समजावें. दूध बंद झालें म्हणजे चहा बंद ! चहा बंद झाला कीं आपल्या नाड्या आंवळल्याच !

चहा हें भिकोबांचें दैवत होतें. या पंढरीची वारी दररोज चारपांच वेळां करायला ते कधींहि चुकत नसत. संस्कृत कवींनीं प्रेमाचा रंग तांबडा ठरविला याचें कारण ते चहाभक्त होते हेंच असावें असा त्यांचा तर्क होता. हा शोध सांगलीला कॉलेजांत असतांना ते कांहीं सहाध्यायांपुढें मांडीत असत. परंतु ते भिकोबांइतके रसिक नसल्यामुळें 'चहापेक्षांहि गाजरं फार लाल असतात; तेव्हां संस्कृत कवींना गाजरं फार आवडत असावींत' अशा युक्ति-

वाद ते पुढें करीत असत. 'गाजरपारखी आहांत, झालं' भिकोबा रागारागानें त्यांना उत्तर देत. राष्ट्रीय निशाणाप्रमाणें राष्ट्रीय पेयाचीहि जरूर आहे व त्या पेयाचा मान चहालाच सर्वथैव योग्य आहे असें भिकोबांचें ठाम मत होतें व कॉलेजांत असतांना राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान जेव्हां आपल्याला मिळेल तेव्हां याच मुद्यावर जोर देण्याचें त्यांनीं ठरवून टाकलें होतें. कधीं काळीं नाटक लिहिण्याची पाळी आल्यास नायकाचें नांव चहा व नायिकेचें नांव कॉफी ठेवण्याचाहि त्याचा मानस होता. हिंदुस्थानला स्वराज्य मिळायचेंच असलें तर तें मोठमोठ्या तोफांनीं न मिळता चहाच्या पेल्यांनींच मिळेल असा एक दूरदृष्टीचा सिद्धांतहि भिकोबांनीं मनांतल्या मनांत सिद्ध करून ठेवला होता. 'चहा तितुका मेळवावा' हें ब्रीद महाराष्ट्रानें पुढें ठेवल्यास त्याचें गतवैभव त्याला हां हां म्हणतां प्राप्त होईल असें ते मोठ्या आवेशानें सांगलींत आपल्या आवडत्या चहाच्या दुकानांत बसून म्हणत असत. सुटींत रामभाऊ मुंबईहून आला कीं भिकोबांच्या व त्याच्या चहाविषयक गोष्टी सुरू होत. रामभाऊ म्हणे 'भिकोबा, ताजमहाल हें जगांतलं मोठं आश्चर्य मानतात. पण मी म्हणतों पर्शियन हॉटेल हें त्याच्यापेक्षाहि मोठं आश्चर्य आहे. बालगंधर्वांचं गाणं, मलबार हिलवरील फिरणं, पहिल्या तारखेदिवशीं पोष्टमनानं मनीऑर्डरीचा गठ्ठा घेऊन आपल्या खोलीकडे येणं, या साऱ्या गोष्टींचा आनंद पर्शियन हॉटेलमधल्या एका प्याल्यांत सांठलेला आहे. माझी खात्री आहे कीं मेनकेनं विश्वामित्राला आपल्या जाळ्यांत ओढलं तेव्हां पर्शियन हॉटेलमधला एक चहाचा पेला त्याला आरंभीं पाजला असला पाहिजे. भिकोबा, कृष्णावतारीं गोपी कृष्णावर एवढ्या फिदा कां असत याचा कधीं तूं विचार केला आहेस काय?' भिकोबांच्या चेहऱ्यावरून पुराणसंशोधनाच्या बाबतींत त्यांचें डोकें चालत नाहीं असें रामभाऊंनीं ताडलें कीं, ते आपलें पुराण पुढें सुरू करीत, 'अरे बाबा हें कळायला डोकं पाहिजे, डोकं! नुसतं पुस्तकाचं पीठ पाडलं म्हणजे झालं नाहीं! कृष्णानं इतक्या गाई कशाला रे बाळगल्या होत्या? माझी खात्री आहे कीं या पर्शियन् हॉटेलचा मूळ संस्थापक कृष्णच असला पाहिजे. त्याचा चहाचा खप अवाढव्य असल्यामुळंच दुधासाठीं त्याला इतक्या गाई राखाव्या लागल्या असतील.' विमाकंपनीच्या एजंटापुढें काय

बोलावें हें जसें सामान्य मनुष्याला कळत नाहीं त्याप्रमाणें रामभाऊंच्या या वक्तृत्वाच्या प्रवाहाविरुद्ध कसे हात मारायचे हें भिकोबांना कळत नसे. पण गीताजयंतींत स्वतःला मिळालेलीं बक्षिसें आठवून ते कृष्णाची कड घेण्याचा प्रयत्न करीत, 'अरेरे! रामभाऊ! मुंबईला जाऊन तूं धर्म बुडविलास. पर्शियन् हॉटेलमधला चहा प्यायला मुंबईत हिंदूंचीं चहाचीं दुकानं नव्हतींच का?'

भिकोबांचा धर्माभिमान जागृत झालेला पाहून रामभाऊंचेंहि धर्मप्रेम उचंबळूं लागे. 'हिंदूंचीं चहाचीं दुकानं सोडलींत असं वाटतं कीं काय तुला? पण कांहीं झालं तरी हिंदु गचाळ ते गचाळच! हिंदु काय नि त्यांचा चहा काय मुसलमानांच्या मानानं मुळींच स्ट्रॉंग नाहीं.'

"उभ्या मुंबईत एकाहि हिंदु दुकानांतला चहा चांगला नाहीं म्हणतोस?" भिकोबा हिंदूंचा लौकिक धुळीला मिळणार या कल्पनेनें भयभीत होऊन विचारीत.

"नाहीं म्हणायला कांदेवाडींत एक प्रधान आहे बुवा, काय फक्कड चहा होतो म्हणतोस तिथला! कुणी म्हणतात कीं तो लेकाचा चहांत अफूच घालतो! त्याची पोरगी चहा करते बघ तो! रूप म्हणशील तर गडकऱ्यांची मथुरा, ठकी, इन्दु व बिंदु यांना कोळून त्यांचा एक अष्टमांश केलेला काढा! पण चहा असा करते कीं बोलून सोय नाहीं! या जगांत रूपावर कांहीं नाहीं हेंच खरं! त्या दुकानदाराची हकीकतहि मोठी गंमतीची आहे. स्वारी कुठल्याशा नाटककंपनींत होती म्हणे, पूर्वीं! गृहस्थ फार बोलका! वाणी अशी रसाळ आहे म्हणतोस! रुबाब तर अगदीं नाटकांतल्या राजासारखा! पण बेट्याला कुठली अवदसा आठवली. चोरी करायला मिळावी म्हणून लेकानं मंडळींच्या चहांत अफूच खूप घातली पुढं एके दिवशीं! सरळ बिनभाड्याच्या घरांत गेली स्वारी. पुढं सुटल्यावर मग हें दुकान काढलंन्."

"या हिंदु दुकानांतला चहा इतका चांगला असतांना मग तूं पर्शियन् हॉटेलमध्यें कशाला जातोस?"

"त्या दुकानांत चहाच्या प्याल्याबरोबर जुगारी लोकांनाहि उकळ्या फुटतात. जिभेची तलफ भागवायला जावें न् हातांत कडीतोडे पडावे अशा-

तला प्रकार व्हायचा. तो दुकानदार इकडलाच कुठला तरी कोंकणांतला असावा. गोव्यांत कुठेंशी देवी आहे म्हणे त्याची !"

भिकोबा एल्एल्. बी. करितां पुण्याला गेले, तेव्हां कोंकणांत मुंबईवरून येऊं लागले. पण मुंबईत रामभाऊ व खिशांत पैसे नसल्यामुळें 'पर्शियन हॉटेल' व 'कांदेवाडी हिन्दु हॉटेल' यांची तुलना करण्याची संधि त्यांना कधींच मिळाली नाहीं. चहाविषयीं विचार सुरू झाले तेव्हां रामभाऊंचें कांदेवाडींतील चहाचें वर्णन मात्र त्यांना सहजासहजीं आठवूं लागलें. उद्यांपासून गवळ्यानें हात आंखडता घेतला तर आपले हातपाय चालणें शक्य नाहीं, हा विचार मनांत घोळूं लागल्यामुळें घरीं परत येतांयेतां या साऱ्या चहाविषयक जुन्या गोष्टींची त्यांना स्मृति झाली. आई व भावंडें यांच्यासाठीं नसली तरी चहासाठीं तरी आपणांला मास्तरकी पत्करावी लागणार असा त्यांना रंग दिसूं लागला. चहाबरोबर मास्तर झाल्याचा अपमान सहज गिळून टाकतां येईल अशीही त्यांनीं आपल्या मनाची समजूत घातली.

ते घरांत पाऊल टाकतात तों रामभटजी व आपली आई यांचें कांहीं तरी खलबत चालू असल्याचें त्यांना दिसलें. 'हा बेटा आपली बेटी खपविण्यासाठीं लाळ घोटीत असेल; पण म्हणावें याद राखून ठेव भटा. वकील आहें, वकील मी' असें मनांतल्या मनांत गर्जून उद्गार काढीत भिकोबांनीं भाजी आईपुढें टाकली.

"बाळ, तुला मुलगी सांगून आली आहे !" आई आनंदित मुद्रेनें म्हणाली.

"कुणाची ?" बापाचें भूत दृष्टीला पडल्याबरोबर दचकणाऱ्या हॅम्लेटसारखा चेहरा करून रामभटजीकडे पहात भिकोबांनीं विचारलें.

"वर बसले आहेत ते. जाहागीरदार आहेत मोठे" रामभटजी हलक्या स्वरांत म्हणाले. भिकोबांची छाती धडधडूं लागली. शनीला आपला कंटाळा येऊन त्यानें सहा महिने आधींच आपला गाशा गुंडाळला कीं काय ? देव मनुष्याचा कधीं अंत बघत नाहीं हेंच खरें. न्यायाधिशापुढें उभें रहातांना भिकोबा कांपत नसत असें नाहीं. पण आतां त्यांचे पाय हींव भरल्याप्रमाणें लटलटां कांपूं लागले. जहागीरदार तर आपल्या वकिली दिवाणखान्यांत जाऊन बसले आहेत. जॉननें शिवलेला नवा सूट माडीवरल्या कपाटांतच

आहे. तो आणायला आपणच जावें तर तें वाईट दिसणार. भिकोबांनीं बरेंच डोकें खाजविलें व शेवटीं रामभटजींना गुरुमंत्र दिला. रामभटजी गुरूप-देशाप्रमाणें ते कपडे हळूच उपरण्यांत गुंडाळून घेऊन खालीं आले व भिकोबा रंगूं लागले. 'माडीवर जहागीरदारांच्या गोष्टीला जातों मी' असें म्हणत रामभटजी वर झटकलेले पाहून आई म्हणाली, "भिकू चहाची पूड संपली आहे रे" सुटाचा धूर भिकोबाच्या डोळ्यावर नुक्ता कुठें चढूं लागला होता. काढून टाकलेल्या कोटाचे खिसे चांचपीत त्यांनीं एक आणेली बाहेर काढली व आईच्या हवालीं केली. मधांशीं रामभाऊला भाजीसाठीं दोन आणे देण्याची सुबुद्धि झाली हें आपलें केवढें भाग्य, असा विचार या वेळीं त्यांच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

"अशा चारचार पैशांची धूळ आणली म्हणजे आयत्या वेळीं दात पडायची पाळी येते बघ. कशाला हवेत ते हजार रुपये शिल्लक? लंकेला सोन्याच्या विटा न् घरांत सदा नकारघंटा."

"बापू येईल आतां इतक्यांत शाळेंतून. त्याच्याकडून घे चहा आणून." असें म्हणून भिकोबांनीं माडीचा रस्ता सुधारला. वकिली टेबलाजवळ बसलेली व्यक्ति पहातांच ते जहागीरदार आहेत याची भिकोबांना पूर्ण खात्री पटली. डोक्यावरच्या रुमालावर जिकडे तिकडे जरच दिसत होता. खांद्यावरून मांडीवर लोळत पडलेलें वीतवीत कांठाचें उपरणेंहि भारी किंमतीचें असावें. करंगळींत व दुसऱ्या बोटांत सहले व आंगठ्या यांची गर्दी उडून गेलेली दिसत होती. भिकोबांनीं किंचित् लवून नमस्कार केला. जहागीर-दारांनीं त्याचा सस्मित स्वीकार केला. भिकोबा खुर्चीवर बसले. बोलण्याचा आरंभ कसा करावा हेंच त्यांना कळेना.

"आपल्याकडे आम्ही कां आलों हें कळलंच असेल आपल्याला." फोनोग्राफांतील ह्यः ह्यः ह्यः ला लाजविणारें हास्य करून जहागीरदार म्हणाले. "आपण वकील आहांत. आमच्याकडे एक केस आहे. केस म्हणजे मुलगी हं. उपमा कांहीं उगीच नाहीं दिली मी. केस आणि मुलगी या दोघींना पैशावांचून कुणीच पत्करत नाहीं जगांत. आमच्या मुलीनें स्वयंवर मांडल्या-मुळें तर मला इतकें दुरून कोंकणांत यावें लागलें."

जहागीरदारांच्या मुलीचा 'पण' कोणता असावा याचा भिकोबांना

तर्कच होईना. त्यांचे भावी श्वशुर पुढें बोलूं लागले, " तिला म्हणे वकील नवरा पाहिजे. सीतेला धनुष्य वांकविणारा पति पाहिजे होता; तिला आशि-लांना वांकविणारा पाहिजे. द्रौपदीनें मासा मारणाऱ्या-म्हणजे कोळी नव्हे हं—जाऊं द्या तें. मुद्दा एवढाच कीं करीन तर वकिलाशींच लग्न करीन असा तिचा ' पण ' पडला. मग करतां काय ? अडला जहागीरदार, धरी वकिलाचं दार. इकडल्या बाजूला आपल्या जातीचे लोक बरेच आहेत. म्हाडदळची म्हाळसा हेंच आमचं कुलदैवत. म्हटलं यावं एकदां मुलीसह फेरी टाकून. स्वार्थ न् तीर्थ दोन्ही साधतील. झालंहि तसंच. तीर्थाच्या ठिकाणीं या रामशास्त्र्यांची गांठ पडली. त्यांनीं आपलं स्थळ आम्हांला सांगितलं, फार आनंद झाला. दिपोटी परिक्षेला आले न् मुलाला नकाशा-वरलं स्थळ सापडलं म्हणजे मास्तरांना जेवढा आनंद होतो त्याहूनहि अधिक आनंद झाला आम्हांला ! "

आपल्यापुढें आपले भावी श्वशुर बसले नसून ज्याची उलट तपासणी करावयाची आहे असा प्रतिपक्षाचा साक्षीदार उभा आहे, अशी भिकोबांनीं कल्पना केली व कपाटाकडे पहात ते जहागिरदारांना म्हणाले, " लग्न म्हणजे एक प्रकारचा जुगार आहे. म्हणून जरा—" जुगार शब्द ऐकतांच जहागीर-दारांची मुद्रा किंचित् काळवंडली; पण कपाटाकडे एकाग्र दृष्टीनें पहाणाऱ्या भिकोबांच्या लक्षांत हा फरक येणें शक्यच नव्हतें. भिकोबा पुढें म्हणाले, " आपला थोडा परिचय झालेला बरा ! "

" हो हो, परिचयाविषयीं म्हटलंच आहे ना कुणीसं, अति परिचय खोटा— जाऊं द्या तें. "

" आपण कुठले जहागिरदार ? "

" मोतीचूरचे. "

" मोतीचूर ? नांव जरा कसंसंच लागतं, नाहीं ? "

" कससंच कसलें ? बुंदेलखंड या नांवावरून त्यांत बुंदी पाडतात असं कांहीं सिद्ध होत नाहीं. आमच्या गांवांत पूर्वीं रस्त्यांवरच मोत्यांचा चूर पडलेला असे. आमच्या जहागिरीचं नांव त्याच्यावरून पडलं आहे. "

" कुठेंसं आहे हें मोतीचूर ? "

" कुठं ? तुम्हांला—तुम्हांला असोदं माहीत आहे ना खानदेशांतलं ? फार

प्रसिद्ध आहे बरं गांव तें, " फार प्रसिद्ध असलेलें गाव माहीत नाहीं असें सांगण्याचा वकीलसाहेबांना धीर होईना. त्यांनीं होकारार्थी मान डोलाविली. जहागिरदार पुढें सांगूं लागले, ' त्या असोद्याजवळ मोतीचूर आहे. असोदं- देखील पूर्वीं आमचंच होतं. असोदं म्हणजे ज्या गावांत सोदे रहात नाहींत तें ! पहा केवढा सच्चेपणा पूर्वीं आमच्या जहागिरींत होता तो; अलीकडे मात्र हें सारं गेलं. नुक्तीच फार मोटी चोरी होऊन घरांतली सारी चीजवस्त गेली. म्हणून कांहीं भीति नाहीं म्हणा आम्हांला ! दुकानांतल्या साऱ्या वस्तु संपल्या तरी चहा असेपर्यंत दुकानदाराला गिऱ्हाइकाची वाण पडत नाहीं !' चहाचा दाखला जहागीरदारांच्या तोंडीं फारसा शोभत नाहीं असें वकिलांना वाटलें. पण जुन्या माणसांत मार्मिकतेइतकी सौन्दर्यदृष्टि नसते असें मानून त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें.

" चहा आहे म्हणजे काय तें सांगा वकीलसाहेबांना. त्यांच्या कायद्यांतली भाषा नव्हे ही सहजासहजीं समजायला. " रामभटजींनीं सूचना केली.

" चहा आहे म्हणजे मुलीच्या अंगावरले दहा एक हजारांचे दागिने आहेत. कन्यादानाच्या वेळीं ते आम्हीं तिच्या अंगावरच ठेवणार आहोंत. शिवाय नाहीं म्हटलं तरी आमच्या जहागिरीचं वर्षाचं उत्पन्न पांच हजारांचं आहे. कांहीं झालें तरी तें शेवटीं जांवयालाच मिळावयाचं आहे ! " चहा पाहून कधींहि सुटलं नसेल इतकं पाणी वकीलसाहेबांच्या तोंडाला सुटलं. ते गार होऊन ऐकतच राहिले. " आतां मुद्याकडे वळूं या वकीलसाहेब. मी मुलीचा बाप असलों तरी तिचे दोष कांहीं चोरून ठेवीत नाहीं. श्रीखंड म्हणून एखाद्याच्या पानांत पिठलं वाढणारा इसम मी नाहीं. पहिली गोष्ट मुलीच्या वयाची. सतरा सरून तिला बरोबर अठरावं वर्ष लागलं आहे. कोणत्या सालीं झाली बरं ती ? गडकऱ्यांचं प्रेमसंन्यास स्टेजवर आलं त्याच सालीं—"

भिकोबा आश्चर्यचकित झाले. गडकऱ्यांच्या प्रेमसंन्यासाचा आपल्या भावी पत्नीच्या जन्माशीं काय संबंध आहे हें त्यांना कळेना. त्यांनीं भांबावून विचारलें, " गडकऱ्यांची व आपली ओळख होती वाटतं ? "

" ओळख ? नुसती ओळख काय घेऊन बसलांत हो ! त्यांच्या कंपनींत चार महिने होतोंच ना मी. कंपनी म्हणजे सहवास हो ! नाहीं तर भलताच

अर्थ कराल. त्या चार महिन्यांत गडकरी माझ्याशिवाय एक दिवसदेखील चहा प्यायले नाहींत. गडकरी मोठे चहाभक्त होते हें भिकोबांना ठाऊक होतेंच. त्यांची अलौकिक प्रतिभा चहानेंच प्रफुल्लित झाली असावी असा त्यांचा कयास होता. आपले श्वशुर गडकऱ्यांचे जानीदोस्त असावेत याचा त्यांना अभिमान वाटूं लागला. जहागीरदार पुढें बोलूं लागले, ' वय ऐकलंत तुम्ही ! आतां रूप ! सोनीचा रंग आपला काळासावळा आहे. पण साखर-भातापेक्षांहि वांगीभात रुचकर लागतो हें लक्षांत आलं म्हणजे आपल्या-सारखीं समंजस माणसं त्याविषयीं कांहीं फारशी तक्रार करणार नाहींत अशी खात्री आहे. तिचे गाल भज्यांप्रमाणं तांबडे नसले तरी उत्तम पुरीप्रमाणं फुगीर आहेत. बघितल्याबरोबर तुकडा मोडावा असंच कुणालाहि वाटेल. ” जहागिरदारांच्या सर्व उपमा खाद्य पदार्थांच्याच कां याव्यांत हें भिको-बांना कळेना. ते खादाड तरी असावेत किंवा गडकऱ्यांप्रमाणें दुसऱ्या एखाद्या पक्कान्नप्रिय लेखकाशीं त्यांचा परिचय तरी असावा असें त्यांना वाटूं लागलें.

“ तिसरा मुद्दा शिक्षणाचा ! ” जहागीरदारांनीं सुरुवात केली, “ आमच्या सोनीचं वाचन काय जबरदस्त आहे म्हणतां. झाडून साऱ्या मालांचीं पुस्तकं तिनं वाचून काढलीं आहेत. चहा तर इतका उत्तम करते कीं तो एकदां प्याल्यावर तुम्ही आश्चर्यानं आ वासूनच रहाल. जहागीरदारांची मुलगी असूनहि पोरगी पक्कान्नं करण्यांत फार सुग्रण. तिची बटाट्याची भाजी तर साऱ्या मुंबईत—— ”

“ मुंबईत काय ? ” भिकोबांनीं विचारलें.

“ नाहीं, म्हटलं मुंबईच्या साऱ्या सुधारलेल्या बायकांतदेखील तिच्या सारखी बटाट्यांची भाजी करणारी कुणी नाहीं. तिचा रंग जिलबीसारखा नाहीं, तोंड लहानपणीं देवी आल्यामुळं घडीच्या पोळीसारखं न दिसतां आंबोळीसारखं दिसतं, या गोष्टी आपल्या सोडून द्या. अहो, रूपानं पोट थोडंच भरतं ! ” जहागीरदारांनीं हातरुमाल सोडून मोत्यांचीं कांकणं, नथ वगैरे दागिने टेबलावर ठेवले. “ हे सारे दागिने सोनीला देणार आहें मी. पहा आपला विचार. आणूं का दाखवायला ? ” ' असली शूर्पणखा पाह-ण्याचीदेखील मला इच्छा नाहीं ' असें म्हणावेंसें वाटलें न वाटलें तोंच

भिकोबांच्या डोळ्यापुढें जॉन शिंपी, दोन आणे देणारे रामभाऊ वगैरे मंडळी उभी राहिली.

"पहायला कांहीं हरकत नाहीं." वकीलसाहेब म्हणाले. रामभटजी पडत्या फळाची आज्ञा घेऊन गेले व भिकोबा जन्मांत न पाहिलेलीं मोत्यांचीं कांकणें पहात बसले.

त्या मोत्यांच्या बांगड्या पाहतां पाहतां नशीब म्हणून कांहीं तरी चीज आहे अशी भिकोबांची खात्री झाली. कुठें खानदेशांतलें मोतीचूर आणि कुठें कोंकणांतील सावंतवाडी! काश्मीरची शाल रामेश्वराच्या ब्राह्मणाच्या अंगावर जाऊन पडावी तशांतला आपल्या लग्नाचा योग दिसत आहे. मोतीचूर लाडू ज्यानें जन्मांत पाहिले नाहींत त्याला मोतीचूरकरांची मुलगी सांगून आली. उद्यां हा म्हातारा जहागीरदार मेला—न् तो लवकर मरणारच. मृत्यु हातांतल्या अंगठ्या व डोक्यावरील जरीचा रुमाल पाहून याला तरणा-बांड मानील असें थोडेंच आहे? हा म्हातारा मेला कीं मोतीचूरची जहागीर आपलीच आहे. मग भिकाजीपंत वकिलांचा थाट काय विचारतां! आज दोन आणे उसने देणाऱ्या रामभाऊला आपण दोनशें रुपयांचें बक्षीस देऊं. स्वतःला नाहीं जमलें तर बापूला तरी बॅरिस्टर होण्याकरतां पाठवूं. शान्ती न् सुशी यांना कुठें तरी ढकलण्याची जरूरच पडणार नाहीं मग, संस्थानिक घेतील संस्थानिक लोटांगणें घालीत. आज सकाळीं जॉन शिंपी टाकून बोलला, नाहीं का? चांगली खोड मोडली पाहिजे गुलामाची! उद्यां जहागीर मिळाल्यावर एक सदरादेखील नाहीं टाकायचा शिवायला त्याच्याकडे. बैस म्हणावें लेका हात चोळीत.

"नाव सोनूबाई न् हातीं कथलाचा वाळा—अशी आमच्या सोनीची स्थिति नाहीं हं वकीलसाहेब. नांव सोनुली न् हाती चहाची किटली! झांशीच्या लक्ष्मीबाईनं तलवारीनं मोठमोठया पुरुषांना पाणी पाजलं म्हणून लोक तिचे पोवाडे गातात, पण आमच्या सोनीला तरवार–बिरवार कांहीं नको. किटली हीच तिची तरवार, किटली हीच तिची बंदुक, किटली हीच तिची गदा—"

इतक्यांत ज्या महिषासुरमर्दिनीचें जहागीरदार इतकें रसभरित वर्णन करीत होते तिला प्रत्यक्ष घेऊन रामभटजी समरांगणावर दाखल झाले. भिकाजी-

पंत लुगड्याचा पदर दृष्टीला पडतांच दुसरीकडे पाहूं लागले. मात्र त्यांच्या दृष्टिकोनात हा फरक पडण्याचें कारण भीति नसून लज्जा हेंच होतें.

" बसा सोनूताई. रामभटजी, सोनूताईच्या सासूबाईना हांक मारा " राम-भटजी खालीं निघून गेले. जहागीरदार वकीलांकडे वळून म्हणतात, " वकील-साहेब, गोऱ्या रंगावर भुलून जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अहो हेंच पहा ना, गोरे लोक आमच्यावर राज्य करतात म्हणून तर हिंदुस्थान भिकेला लागलें. गोऱ्या बायकोच्या नवऱ्याची देखील अशीच धूळधाण होते. गीतेंतच म्हटलें आहे ना, ' गोरी गोमटी न् कपाळ करंटी ! ' "

भिकोबांनीं होतें नव्हतें तेवढें धैर्य एकवटून पाहिलें, तिचे केस व ती नेसलेली काळी चंद्रकळा यांच्यापलीकडे त्यांना कांहींच दिसेना. सासऱ्याच्या श्रीमंतीचा धूर इतक्यांतच आपल्या डोळ्यांवर चढला कीं काय हें त्यांना कळेना. रामभटजी वर आलेले पाहून भिकोबा म्हणाले, " आली का आई ? "

रामभटजींनीं दरवाजाकडे बोट दाखविलें. जहागीरदार तिकडे तोंड वळ-वून म्हणाले, " पुढे या आईसाहेब ! म्हणच आहे ना, कीं, सून घ्यावी पारखून जसा पोलीस शोधी खून. " आई किंचित् पुढें झाली. जहागीरदार बोलूं लागले, " मुलीचा रंग जरा काळा आहे. आपलं तिच्या गुणांना गालबोट आहे. शिवाय मोटमोठ्या माणसांचा रंग काळाच असतो. कृष्ण काळा होता म्हणून त्यानं एवढी गीता लिहिली. लोकमान्य टिळक काळेच होते. म्हणून त्यांनीं गीतारहस्य लिहिलं. ते गोखले गोरे होते. त्यांना नाहीं कुठं लिहितां आलं तें ! काय, टिळक काळे होते याच्यावर तुमचा विश्वास नाहीं बसत ? अहो, ऐकीव गोष्ट नाहीं ही. प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेली, आमच्या कंपनींत ते आलेच होते, कंपनी म्हणजे मैत्री बरं का रामभटजी. नाहीं तर म्हणाल आपली नाटक कंपनी, चहाचा पेला न् हे इंग्रजी शब्द एकदां तोंडाला लागले कीं सुटत नाहींत बेटे ! " जहागीरदारांनीं काळेपणाची ही जी कैफियत मांडली तिला कृष्ण व टिळक हे दोघे पुरुष होते असें उत्तर देण्याचें भिकोबांच्या मनांत आलें होतें. पण मुलगी देऊं इच्छिणाऱ्या जहा-गीरदारांनीं त्यांना बोलण्याची मुळीं संधिच दिली नाहीं, त्यांचें विमान पुढें चालूं लागलें, " आईसाहेब. रूप नि तूप हीं दोन्हीं सारखींच. दिसायला बरीं पण पचायला कठीण. त्यांतून रूप काय चहाप्रमाणं वाटेल तेव्हां बनवितां

येतं. थोडी तोंडाला पिवडी फासली, जरा केंस उलटे फिरविले—" आई-साहेबांना आपलें हें भाषण आवडत नाहीं हें जहागीरदारांनीं ताडलें. त्यांनीं मोर्चा बदलला. " पोरगी तुमच्यापुढं आहेच. लग्नाच्या वेळीं तिच्या अंगा-वर दहा हजारांचे मोत्यांचे दागिने मी घालणार आहें. मी मेल्यावर माझी पांच हजारांची जहागीर जावईबोवांचीच आहे. हे पहा ते दागिने." जहागीरदारांनीं टेबलाकडे बोट दाखविलें. रामभटजींनीं मोत्यांचीं कांकणें उचलून आईकडे नेऊन दिलीं. रंगाची बाबत सोडून दिली तरी आपल्या भावी पत्नीचे नाक, डोळे कसे आहेत तें पहाण्याला भिकोबा फार आतुर झाले होते. ते म्हणाले, " रूपाबद्दल कांहीं आई तक्रार करणार नाहीं."

" वाचूनबिचून घ्यायचं असलं तर घे बाबा, नाहींतर मागाहून म्हणशील कीं आईनं माझ्या गळ्यांत ही घोरपड बांधली!"

" घोरपडसुद्धां कांहीं वाईट नसते! यशवंती घोरपड होती म्हणून ताना-जीनं सिंहगड सर केला!" जहागीरदारांनीं हांसून सांगितलें. नंतर मुली-कडे वळून ते म्हणाले, " सोनूबाई, एखादं उत्तमसं गाणं म्हणतां का?"

कोकिळा, बुलबुल वगैरेपैकीं एखाद्या पक्ष्याचा मधुर स्वर आपल्या काना-वर पडणार अशा अपेक्षेनें भिकोबा कान देऊं लागले. पण सोनूताईनें मनुष्यप्राण्याच्याच आवाजांत सुरुवात केली.

जन म्हणती देवा तार। घे देप नवा अवतार ॥ ध्रु० ॥
आसामदेश अति मोठा। किति मजूर भरती पोटा।
पाळणा मळा बाळाचा। किति तऱ्हा सांगु खेळाच्या।
सोडुनी आइबापांना। ये भक्तासाठीं राणा।
उकळतें चुलीवर अधण। करुनियां हांसरें वदन।
उडि टाकी हरहर म्हणुन।
हा चहादेव बघ आला। दुनियेचा पालनवाला ॥

कालिदास, शेले, गडकरी वगैरे सर्व कवींना थक्क करून सोडणारें हें गीत भिकोबा आश्चर्ययुक्त मुद्रेनें ऐकत होते. इंग्रजी वाङ्मय इतकें विपुल व संपन्न, पण या गाण्याच्या तोडीची कविता त्या वाङ्मयांत असेल कीं नाहीं याची त्यांना शंका येऊं लागली. ते पुढें कांहीं तरी बोलणार तोंच जहा-गीरदार म्हणतात, " या जहागिरीच्या पायीं सोनूताईला खेड्यांत रहावं

लागलं. नाहीं तर तिला अशी विद्वान् करून सोडली असती म्हणतां ! पण करणार काय ! शिवाय हिला गायला येऊन तरी काय करायचंय् म्हणा ! तुमच्यासारखे वकील नाटककंपनी थोडीच काढणार आहेत ! "

आवाजानंतर अक्षर पहावें या हेतूनें कागद व पेन्सिल देऊन भिकोबांनीं सोनूताईला एक वाक्य लिहावयाला सांगितलें.

" आमच्या जहागिरीचें उत्पन्न पांच हजार आहे." भिकोबांनीं वाक्य तपासायला हातीं घेतलें. " आमच्या चहागिरीचें उत्पन्न पांच हजार आहे." पुन्हां त्यांनीं दुसरें वाक्य घातलें, " जहाल पक्षच देशाचें खरें कल्याण करील." सोनूताईनीं लिहून दिलें, " चहाळ पक्षच देशाचें खरें कल्याग करील."

पोरीच्या हातांतून चहाची नदी वहात आहे अशी वकीलसाहेबांची खात्री झाली. ते आपल्या श्वशुरांकडे वळून म्हणतात, " च आणि ज सारखेच लिहिते वाटतं ही ? "

" लहानपणींच आई वारली. जहागीर म्हटली म्हणजे दररोज हजार-पांचशें माणूस येऊन चहा पिऊन जाणार. ती देखरेख करतांकरतांच हिच्या नाकीं नव येतात. शिवाय ' ज ' बद्दल ' च ' आलेला कांहीं वाईट नाहीं. पुस्तक जाळलं याच्याऐवजीं पुस्तक चाळलं असा चांगलाच फरक पडायचा लिहिण्यांत." नंतर आईसाहेबांकडे वळून ते म्हणाले, " मग काय ठरतोय् आपला विचार ? "

" भिकू सांगेल त्याच्याबाहेर मी नाहीं."

" नू मी आईच्या सागण्याबाहेर नाहीं."

" पण सांगत मात्र कुणीच नाहीं. मी जरा स्पष्ट बोलतों याची क्षमा करा. जहागिरीच्या गांवीं मला लवकर परत गेलं पाहिजे म्हणून मी ही लगघाई करतों आहें. शिवाय आमचा व्यवहार म्हणजे त्यांत उधारीची बात नाहीं. हो म्हटलं तर लगेच गांवांत जाऊन चार लोकांना तुमची वकिली कशी काय चालली तें विचारणार. ठीकशी दिसली कीं कन्या-दानाचं पाणी सोडलंच म्हणून समजा. तुमच्या वकिलींत कांहीं राम नाहीं म्हणून लोकांनीं सांगितलं तर आमची सीता घेऊन आम्ही मोतीचूरला परत जाणार ! "

भिकोबा व त्यांची आई या दोघांनाहि मोठा पेंच पडला. जिथें धन तिथें गुण हा जगाचा न्याय नित्य अनुभवाला येत असतांना जहागिरदाराच्या मुलीचा केवळ ती काळी अगर कुरूप आहे म्हणून अव्हेर करणें दोघांनाहि जड वाटत होतें. पण त्याचबरोबर विजेप्रमाणें उमटणाऱ्या या जहागिरदारावर पूर्ण विश्वास ठेवावा कीं नाहीं याबद्दल त्यांचा ठाम विचार ठरत नव्हता. एक मन सांगे, ' ही सोन्यासारखी संधि गमावूं नये. ' दुसरें मन म्हणे, ' हें सोनें आहे कीं सोन्याचा मुलामा आहे याचा नीट विचार करा. ' शेवटीं आईच म्हणाली, ' हे दागिने इथेंच असूं देत, विचार करून संध्याकाळीं उत्तर देऊं आम्ही. "

उंची वस्त्राप्रमाणें उंची हास्यहि श्रीमंती दाखवितें असें वाटत असल्यामुळेंच कीं काय जहागिरदारांनी स्वतःच्या साड्याला नसतील इतके मजले स्वतःच्या हास्यावर चढविले. " दागिने खरे कीं खोटे याची तुम्ही परीक्षा करविणार, होय कीं नाहीं ! खुशाल करवा. अहो कर नाहीं त्याला डर कशाला पाहिजे ! खरा रुपया तुम्ही हातावर वाजवा नाहीं तर दगडावर वाजवा, तो खणण् करणारच. चला रामभटजी आम्हांलाहि यांच्या वकिलीविषयीं चौकशी केली पाहिजे. "

जहागीरदारसाहेब उपरणें वगैरे झाडून उठण्याचा अभिनय करूं लागले. भिकोबाची गाळण उडाली. आपल्या पोकळ वकिलीची अब्रू कशी राखायची हें त्यांचें त्यांना कळेना. झाकली मूठ सव्वालाखाची उघडली कीं फुकाची, अशी स्वतःची वकिली. मग हात दाखवून अवलक्षण करून घ्या कशाला ! त्यानें आपले उत्पन्न फुगवून दाखविलें असेल. पण बैलाएवढें फुगवायला तें मुळांत बेडकाएवढें तरी असेलच कीं नाहीं ! एकदां वकील होऊन आपण चुकलों खरे. त्या वकिलीच्या आमिषाला भुलून आलेलें हें सावज हातचें सोडतां उपयोगी नाहीं.

" हें पहा, " भिकोबा म्हणाले, " एकमेकांचं आतां नातं जुळणार. मग उभयपक्षीं अविश्वास उपयोगी नाहीं. "

" म्हणच आहे ना, जिथं विश्वास तिथंच करावा वास. "

" तेव्हां आम्ही कांहीं हें कुणाला दाखवायला जात नाहीं तुम्हांलाहि कांहीं इतर चौकशी करण्याचं कारण नाहीं. "

"ठरलं तर मग !" मोठ्या विजयी मुद्रेनें जहागीरदार म्हणाले, "सोनूताई, आतां असा चहा करशील कीं यंत्र ! पूर्वी मंतरलेलं पाणी शिंपडून एखाद्याला आपल्यामागं कुत्रं करून नेतां येत असे. आजचा चहा असा बनला पाहिजे कीं तो पितांच सासूबाई नृपतिराज तुझ्या भजनीच लागतील."

सोनूताईच्या हातचा चहा आतां आपल्याला जन्मभर प्यायला मिळणार हें मनांत येऊन भिकोबाचा दिल अगदीं खूष होऊन गेला. लग्न तडकाफडकी उरकावयाचें हा तर जहागिरदारांचा मुख्य मुद्दा होता. मोतीचूरला लग्न केलें तर आपल्याला कमींत कमी दहावीस हजार रुपये खर्च येईल असें त्यांनीं सांगितलें. ही उधळपट्टी पर्यायानें आपल्याच उत्पन्नांतून होणार, म्हणून भिकोबा लग्न इकडेच कुठें तरी उरकून घ्यावें असें म्हणूं लागले. जहागिरदारांनीं आपण देखील देवीला नवस केला असल्याचें सांगतांच म्हाडदळलाच चतुर्भुज होणें भिकोबांनीं पसंत केलें. लग्नाच्या बाबतींतहि या कानाची बातमी त्या कानाला लागूं द्यायची नाहीं असें धोरण त्यांनीं ठरविलें. आपली वकिली म्हणजे वाळूचें घर आहे; लग्नाची कुणकुण कुणाला कळली तर एखादा विघ्नसंतोषी मनुष्य मधेंच बिब्बा घालायचा; तेव्हां सारें काम गुपचूप करायचें असें मुत्सद्दीपणाचें धोरण वकीलसाहेबांनीं स्वीकारलें. जहागीरदारांनींहि सोन्याच्या सुईनें रामभटजींचें तोंड शिवून टाकलें.

बँकेंतले हजार रुपये काढून त्यांचे दागिने करण्याचें आईचें धोरण मात्र भिकोबांना मुळींच पसंत पडेना. 'माहेरचे दहा हजारांचे पडणार आहेतच कीं अंगावर' ते पुनःपुन्हां म्हणत. 'म्हणूनच सासरचे हजाराचे तरी पाहिजेत. खोगीर माहेरचें असलें तरी लगाम तरी सासरचा पाहिजेच. नाहीं तर लोक उद्यां आपल्याला तोंड वर काढूं देणार नाहींत' आईचें ठराविक उत्तर येई. आईचें मत बदलत नाहीं असे पाहून भिकोबांनीं आपली वार्षिक शंभर रुपये उत्पन्नाची जमीन गहाण ठेवून पैसे उभे करावयाचें ठरविलें. लग्नांतच रुसून सासऱ्याकडून हजार रुपयांची रक्कम आपण मिळवूं व हे कर्ज फेडून टाकूं अशी त्यांना उमेद होती. भारी व्याजानें एका पाषाणहृदयी सावकाराकडून एका महिन्याच्या मुदतीनें त्यांनीं हजार रुपये आणले व 'ही घे आई बँकेंतली रक्कम' म्हणून ते आईच्या स्वाधीन केले. दोन चार दिवसांतच त्या रुपयांचें दागिन्यांत रूपांतर झालें.

गांवांतल्या कुणाहि मित्राला पत्ता न लागूं देतां भिकोबा पसार झाले व चार दिवसांत चतुर्भुज बनून परत आले. त्याचे सासरे मात्र मोतीचूरहून निकडीची तार आल्यामुळें म्हाडदळहून परस्पर तिकडे निघून गेले. बायकोला 'मोत्याचे सारे दागिने दिले आहेत ना वडिलांनीं !' म्हणून खोदखोदून विचारायला वकिलांनीं कमी केलें नाहीं. वकिलीणबाईनीं 'हो' म्हणून सांगितल्यामुळें भिकोबांची स्वारी मोठ्या रंगांत आली. सासरे निरोप घेऊन जाऊं लागले तेव्हां 'आठ पंधरा दिवसांत मला कांहीं गरज लागली तर आपणांला लिहीन' असें भीड सोडून बोलायलाहि त्यांनीं कमी केलें नाहीं. 'लिहा, अवश्य लिहा.' सासऱ्यांनीं त्यांना आशीर्वाद दिला.

घरीं आल्यावर एक दोन दिवस सोनूताईचा चहा वधूपरीक्षेच्या दिवशींच्या चहाप्रमाणें चटकदार झाला. पुढे मात्र ती लज्जत येईना. भिकोबांनीं एकदोन दिवस वाट पाहून "चहा कां बिघडतो हल्लीं ?" असा पत्नीला सवाल केला.

"अफू संपली आहे." तिनें भीतभीत उत्तर दिलें.

"अफू ?" भिकोबा वीज अंगावर पडल्याप्रमाणें घाबरून म्हणाले. सोनूताई पुढें कांहींच बोलली नाहीं. चहाची लज्जत त्यांतल्या अफूमुळें उत्पन्न होत होती हें भिकोबांना आता पक्कें कळलें. पण जीव देण्याकरता अफू पाहिजे म्हटलें तरी ती आणायला देखील त्याच्यापाशीं पैसे नव्हते मग चहासाठीं अफू कुठून आणणार ? जहागीरदारांच्या घरांत अफूसारख्या गोष्टींचें बंड असायचेंच, असें त्यांनीं आपल्या साशंक मनाचें कसेंबसें समाधान केलें.

आठ दिवसांनीं त्यांनीं श्वशुरांना एक पत्र लिहिलें. त्यांत सौभाग्यवती क्षेम असून आपणांला एक हजार रुपये त्वरित पाहिजेत असें मोठ्या अदबीनें व गोड शब्दांनीं लिहिलें होतें. भिकोबाचें अक्षर वाईट नसल्यामुळें व हें त्यांचें श्वशुरांना पहिलेंच पत्र असल्यामुळें पत्रावरील पत्ता पूर्णपणें सुवाच्य होता, पण पाप्याला परमेश्वर जसा सांपडत नाहीं त्याप्रमाणें पोस्टखात्याला मोतीचूरचे जहागिरदार कुठेंच मिळाले नाहींत. 'Try Motipur' अशासारखे प्रयत्नवादी छाप आणि मृत्यूची आठवण करून देणारा डेड लेटर ऑफिसचा शिक्का यांनीं अलंकृत होऊन तें पत्र पंधरा दिवसांनीं परत

भिकोबांच्याकडे आलें. आपले श्वशुर मोतीचूरला कदाचित् नसतील ! पण ते बाहेरगांवीं गेले असले तरी पत्र परत कां यावें हें त्यांना कळेना.

नवे केलेले दागिने विकावे तर आईला संशय यायचा. तेव्हां सावकारचा वायदा संभाळण्याकरतां बायकोकडेच एखादा मोत्यांचा दागिना मागण्याचें त्यांनीं ठरविलें. लग्न झाल्यापासून तिनें कधींहि ते अंगावर घातले नव्हते. ' नवऱ्यापेक्षां बायकांची दागिन्यांची पेटीच भाग्यवान् असते. बिचाऱ्या नवऱ्याला त्या दागिन्यांचा कांहींच उपयोग नसतो. ' ते म्हणाले.

" माझे दागिने ते आपलेच नव्हत का ? नि मला ते घालायला नकोत असं थोडंच आहे ? पण बाबांनींच ते अंगावर घालूं नकोस म्हणून सांगितलं आहे. हवं तर देतें त्यांतला एखादा मी. पण एक कबूल केलं पाहिजे माझ्यापाशीं. इथें आल्यापासून चिवडा, भजीं, श्रीखंड कांहीं म्हटल्या कांहीं बघायलादेखील मिळत नाहीं. बाजारांतून दररोज आणून दिलं पाहिजे मला कांहीं तरी. " पत्नीनें उत्तर दिलें.

दुसऱ्या एखाद्या वेळीं असल्या खादाड बायकोचा भिकोबांना राग आला असता. पण करतात काय ? ' अडला पती, धरी बायकोचे पाय माथीं ' जहागीरदारांची मुलगी, माहेरीं खाण्याचे चोचले चालत असतील, माणसाची संवय कांहीं एका दिवसांत मोडत नाहीं, असें म्हणून सोनूताईला दररोज बाजारांतून कांहीं तरी आणून द्यायचें त्यांनीं कबूल केलें व मोत्यांच्या कांकणाची एक जोडी पदरांत पाडून घेतली.

दुसरे दिवशीं सकाळीं मोती पारखणारा मनुष्य येणार होता. त्याची वाट पहात भिकोबा दारांत उभे होते. इतक्यांत समोरून माठेवाड्याचे रामभाऊ आले. त्यांनीं दुरूनच गर्जना केली. ' खरे वकील आहात बुवा. लग्न झालं याचा कुणाला पत्तादेखील लागूं दिला नाहीं. असं चोरून ठेवायला लग्न म्हणजे खोटी साक्षाविक्ष तर नाहीं ना ? रामभाऊ घरच्या पायऱ्या चढले. भिकोबांचा नाइलाज झाला. घरांत दोन पेले चहा ठेवायला सांगून ते रामभाऊंना घेऊन आपल्या न्यायमंदिरांत जाऊन बसले.

" काय रामभाऊ, नवीन बातमी काय आहे ? "

" तुमचं लग्न झालं हीच ! "

" ही आम्हांला तर जुनीच आहे. दुसरी सांगा ना एखादी. "

" कालच्याच नव्या काळांत आली आहे पहा. तें कांदेवाडींतलें चहाचं हिंदु दुकान अगदीं पर्शियनसारखा चहा होतो म्हणून मी सांगत होतों पहा."

' हं ' त्या चहाची व अफूची आठवण होऊन भिकोबा म्हणाले.

" त्या दुकानांत चोरटा जुगार चालत असे म्हणून मीं तें सोडलं. नुसता चोरटा जुगारच नव्हता रे. त्या दुकानदारानें जुगार खेळायला येणाऱ्या एका माणसाचे खरे दागिने चोरून त्यांच्याऐवजीं खोटे मोत्यांचे दागिने ठेवले म्हणे. स्वारी दीड महिन्यापूर्वींच फरारी झाली आहे. पोलिसांनीं अगदीं कसून तपास चालविला आहे त्याचा व दागिन्यांचा. तो महिन्यापूर्वींच सावंतवाडीला आला असल्याची बातमी आहे पोलिसांना. आश्चर्य आहे कीं नाहीं ? "

भिकोबा कांहींच बोलले नाहींत. पण त्याच्या चेहऱ्यावर मात्र आश्चर्य पूर्णपणें दिसत होतें.

" बरं, जातों आतां मी. " इतका वेळ बसूनहि लग्नाचा चहा मिळत नाहीं असें पाहून रामभाऊ जरा कुऱ्यानेंच म्हणाले.

" बसा ना जरा. "

" बसायला फुरसद कुठं आहे हो ? ते सहावीचे मास्तर कुठं बरी नोकरी मिळाली म्हणून चार दिवसांपूर्वीं एकदम निघून गेले. त्याचं काम आमच्या वर पडलं आहे ना ? रिकामी जागा भरायला नाहीं म्हटलं तरी महिना पंधरा दिवस तरी खास लागणार ! "

इतक्यांत सोनूताई चहाचे दोन पेले घेऊन आल्या. भिकोबा पुढें जाऊन पेले घेऊं लागले. रामभाऊ हळूच चोरून आपल्या वहिनींचा मुद्रा-परिचय करून घेत होते. त्यांच्याकडे सोनुताईची दृष्टि जातांच त्याच्या हातांतील एक पेला खळकन् जमिनीवर पडला.

" धांदरट कुठली. जा दुसरा पेला घेऊन ये न् मग हे तुकडे भरून टाक ! "

आपल्या हातांतील पेला रामभाऊंपुढें ठेवून भिकोबा म्हणाले, " घ्या. रामभाऊ घ्या. "

" ह्या आतां आल्या होत्या त्यांचं तुमचं कांहीं नातं आहे का ? "

भिकोबा खो खो करून हंसूं लागले. " नातं ? अगदीं जवळचं आहे. "

" जवळचं ? " चिंतातुर चेहऱ्यानें रामभाऊंनीं विचारलें.

" हो. गृहस्था, माझी बायकोच ना ही ! "

भूत दिसावें त्याप्रमाणें रामभाऊ चपापले.

" कां बोवा, चपापलांतसे ? "

" ह्या तर त्या कांदेवाडींतल्या दुकानदाराच्या मुलीसारख्या दिसतात. "

" रामभाऊ, थट्टा झाली तरी तिला कांहीं मर्यादा असावी, " भिकोबा चिडून म्हणाले. रामभाऊ मुकाट्यानें चहा प्याले व नमस्कार करून निघून गेले. भिकोबा रामभाऊंच्या भाषणाचा जों जों विचार करूं लागले तों तों आपण जहागीरदाराऐवजीं एका जुवेबाज व लफंग्या चहावाल्याचे जांवई झालों अशी त्यांची खात्री झाली. सोनुताईला हात धरून फरफटतच त्यांनीं आपल्या वकिली दिवाणखान्यांत आणलें व टेबलावरील सर्व कोडांच्या साक्षीनें कांदेवाडींतील दुकानाविषयीं प्रश्न विचारले. मुळुमुळु रडत तिनें आपल्या बापाचें कांदेवाडींत चहाचें दुकान होतें हें कबूल केलें. हें ऐकून भिकोबा रागारागानें तिच्या पाठींत रपाटा घालणार तोंच मोती पारखण्याला आलेल्या इसमानें खालून हांक मारली, " वकीलसाहेब ! " वकीलसाहेबांनीं वकीलीणबाईंना सोडून देऊन त्याला ओ दिली. तीं मोत्यांचीं कांकणें त्याला दाखवावीं कीं नाहीं याचा त्यांना विचार पडला. परंतु सोक्षमोक्ष काय तो एकदांच होऊन जाऊं द्या, असा विचार करून त्यानीं तीं त्याच्यांपुढें ठेविलीं तीं हातांत घेऊन निरखून पाहतांच तो म्हणाला, " वकीलसाहेब, कोर्टांत खोटी साक्ष पचत असली तरी आमच्या नजरेपुढं खोटं मोती टिकत नाहीं." त्याची समजूत घालून त्याला वाटेला लावतां लावतां भिकोबांची पुरेवाट झाली. सावकाराचा महिना भरत आला, व्याज देण्याचें देखील आपल्याला बळ नाहीं, आईला हजार रुपयांची गोष्ट सांगावयाची कशी, सावकार जमीन खाऊन बसला तर वर्षाचें शंभर रुपयांचें खात्रीचें उत्पन्न आहे तेंहि जाणार. जहागीरदाराचा जांवई होतां होतां एक पोट मात्र आपण जास्ती मागें लावून घेतलें, या सर्व विचारांनीं वकीलांचें डोकें भणाणून गेलें. खालून जॉनची हांक ऐकूं आली, " वकीलसाहेब ! " त्यांनीं मुकाट्यानें टेबलावरील कागद घेऊन शाळेंतील रिकाम्या जागेबद्दल अर्ज लिहिण्याला सुरुवात केली.

" वकिलसाहेब, अहो वकिलसाहेब, लक्ष्मीपूजनाला येतां ना, मोतीलाल शेटजींकडे ? "

धनेश्वर वकिलांच्या माडीवरून मुळींच उत्तर आलें नाहीं. हांका मारणारी मंडळी पुढें चालूं लागली. चालतां चालतां एक म्हणाला, " मिळालें असेल एखादें घबाड ! "

" पुरुषस्य भाग्यम् ! वकिलीची सनद काढून दोन वर्षे झालीं नाहींत तोंच स्वारी खोऱ्यानें पैसे ओढूं लागली. " दुसरा उद्गारला, " ज्यांचें कुळ शोधूं नये असे ऋषितुल्य वकील पैशाला पासरीभर झाले आहेत. म्हणून धनेश्वरांचें कौतुक वाटतें. " तिसऱ्यानें मल्लिनाथी केली.

पहिला—पण सुटींत कसली कुळांची कर्मकटकट घेऊन बसतात हे ?

दुसरा—त्यांचें लक्ष सध्यां दुसऱ्या कुळापेक्षां स्वतःच्याच कुळाकडे-कुल-दीपकाकडे म्हणा ना-लागलें आहे.

तिसरा—दीपिकेकडे म्हण, धनेश्वरांना मुलगी झाली आहे, मुलगा नाहीं ?

पहिला—जगांत मूल काय तें यालाच झालें आहे वाटतें ! काहीं नाही तरी आमचें कुटुंब पांचसहा वेळां बाळंतपणासाठीं माहेरीं गेलें ! पण मी नाहीं बसलों कधीं अशी जपमाळ घेऊन. त्यांत काय आहे येवढें ? दिवसामागून रात्र आणि रात्रीमागून दिवस, हें रहाटगाडगें चाललेंच आहे जगांत. बाळंतपणाकरितां बायको माहेरीं जायची व बाळंत झाल्यावर तीन चार महिन्यांनीं परत यायची, हें ठरलेलेंच आहे !

दुसरा—तुम्हीं बोवा पडलां मोठे तत्त्वज्ञ, सुखदुःख सारखें मानणारे ! बायको इथें असली तरी काय न् नसली तरी काय, सारखेंच तुम्हांला. पण धनेश्वरांचें सगळेंच खातें निराळें आहे. बायको बाळंत होऊन चारच महिने झाले असतील; पण ते तिच्या वाटेकडे डोळे लावून बसले आहेत !

पहिला—वाट पाहतां पाहतां याच्या डोळ्यांची वाट लागणार झालें !

तिसरा—फत्तराला फुलाचें मन काय कळणार ? म्हटलें माया वेडी असते,

गेला एक महिना तर धनेश्वरांचें कोर्टाच्या कामांत फारसें लक्षच नाहीं. बायकोचा न् मुलीचा फोटो गेल्या पंधरवड्यांत आला आहे. लिहितांना टेबलावर, निजतांना उशाशीं आणि कोर्टांत जातांना बॅगमध्यें तो फोटो असतोच असतो.

पहिला—वेडाला काय शिंगें असतात निराळीं ? उद्यां बायको मेली तर काय अंगाला राख फांसून हा संन्याशीच होणार वाटतें ?

दुसरा—तुझ्या जिभेला बोचा हाडच नाहीं. इतक्यात त्याची बायको मरायला काय झालें आहे ? बाकी तसा प्रसंग आला तर तो वेडाच होऊन जाईल म्हणा !

पहिला—म्हणजे आज बायको आहे म्हणून वेडा न् उद्यां नाहीं म्हणून वेडा !

तिसरा—अशी थट्टा करण्यांत काय अर्थ आहे ? परवां बंगालच्या कटाच्या खटल्यांत इतकीं जळजळणाऱ्या हृदयांचीं व खळखळणाऱ्या रक्ताचीं माणसें फांशीं गेलीं. त्यांच्या बायका काय वेड्याच झाल्या आहेत ? कोमल अंतःकरणाच्या बायका जिथें वेड्या होत नाहीत तिथें पुरुष कसले वेडे होणार ? ज्यानें बर्फ वितळत नाहीं, असल्या उन्हानें दगड कसा वितळणार ?

बोलतां बोलतां मंडळी मोतिलाल शेटजींच्या दुकानासमोर आली व आंत शिरली. धनेश्वर वकिलांनीं ही मंडळी किंचित् पुढें गेल्यानंतर खिडकींतून डोकावून पाहिलें होतें. अधिक हांका मारण्याच्या भरीला न पडतां तें त्रिकूट पुढें गेलेलें पाहून त्यांना आनंद झाला. ते टेबलापाशीं आले व गुलाबाचें फूल घातलेल्या पत्नीच्या फोटोकडे पाहून म्हणाले, "लक्ष्मीपूजन ! चोपड्यांची पूजा करून लक्ष्मीपूजन करणाऱ्या या लोकांना काय म्हणावें ? माझी लक्ष्मी ही—प्रेमाचा जमाखर्च ठेवणारी व हृदयाच्या व्यापारांत कधींहि टोकर लागूं न देणारी गृहलक्ष्मी सोडून पाढ्यावर काळें केलेल्या चोपड्याची पूजा कोण करीत बसणार ? या फोटोकडे पाहिलें म्हणजे मला झालेला लाभहि स्पष्ट दिसतो. माझ्या लक्ष्मीनें मला हें रत्न दिलें आहे. नांव तरी किती गोड ठेविलें आहे मुलीचें ! 'वसुधा !' माझी लक्ष्मी म्हणजे जगांतील सगळी संपत्ति आणि माझी वसुधा म्हणजे सगळी पृथ्वी ! या दोन्ही मला मिळाल्यावर माझ्यासारखा सुखी दुसरा कोण आहे ? पण ह्या मिळणार केव्हां ? उद्यां तर बलिप्रतिपदा. दुपारच्या गाडीनें मंडळी यायची ? पण संध्याकाळ झाली

तरी पत्ता नाहीं. दुपारची गाडी चुकली कीं काय? खरेंच सध्यां आमच्याकडे विमानें असतीं तर किती बहार झाली असती!"

दरवाजावर कुणी टिक टिक केल्यामुळें धनेश्वरानीं खोलीचें दार उघडलें. त्यांचा कारकून आंत आला व म्हणाला, "नवीन कज्जा आला आहे एक."

"मी बायकोची वाट बघतों आहें, कज्जाची नाहीं."

"पण हजार पांचशें तरी सहज मिळतील!"

"गावांत इतके वकील पडले आहेत. जा म्हणावें त्यांच्याकडे." धनेश्वरांनीं धाडकन् दार लावलें. ते स्वतःशींच पुटपुटले, "मला यावेळीं वसुधेचे मुके बोल ऐकायचे आहेत; रुपयांचा खणखण नाद ऐकायचा नाहीं. तिच्याशीं गोष्टी करायला पाहिजेत; मारामाऱ्या न् खून याच्या गोष्टी नको आहेत!"

पुन्हां दार वाजलें. धनेश्वरांनीं तें रागारागानें उघडलें. तार घेऊन पोस्टाचा शिपाई आला होता. धनेश्वरांनीं थरथर कांपणाऱ्या हातानें सही केली व तो पिवळा लखोटा फोडला. 'आगगाडीचा अपघात—बायको, मुलगी व मेव्हणा दगावलीं' हे शब्द वाचतांच त्याच्या डोक्यावर एकदम वज्राघात झाला. क्षणभर त्यांना घर गरगर फिरत आहे असें वाटलें व दुसऱ्याच क्षणीं ते मूर्च्छा येऊन जमिनीवर पडले!

२

कालासारखा प्रवासी जगांत दुसरा कोणीच नाहीं. कोट्यवधि वर्षांपासून तो एकसारखा चालत आहे. पण तो क्षणभरदेखील विश्रांतीकरितां कुठें थांबत नाहीं. त्याच्या मार्गावरील वृक्ष सुखाच्या वसंतानें पल्लवयुक्त झालेले असोत वा दुःखाच्या हेमंतानें निष्पर्ण झालेले असोत, लष्करी शिस्तींत रुळलेल्या शिपायाप्रमाणें काळ प्रमाणबद्ध पावलें टाकीत पुढेंच जातो. धाडशी संशोधकांनीं जीवाचें रान करून मोठमोठ्या नद्यांचे उगम शोधून काढले आहेत, पण बाल यमुनेचा उगम कुणीहि पाहिलेला नाहीं. मनुष्यानें पंचमहाभूतांना आपले दास केले आहेत. पण काळाला एक पळभर थांबविण्याची शक्ति अद्यापिहि त्याला सापडली नाहीं. एका डोळ्यांत आनंदाश्रु तर दुस-

ऱ्यांत दुःखाश्रु, एका कानांत विवाहाचे मंगल मंत्र तर दुसऱ्या कानांत उत्तर क्रियेचे उद्विग्न विलाप, एका हातांत प्रणयाच्या पुष्पमाळा तर दुसऱ्या हातांत यमाचा पाश, एका पायांत आशेचा घुंगुरवाळा तर दुसऱ्या पायांत निराशेची तुटणारी आंतडी ! विचित्र वेषानें काळपुरुष युगानुयुगें आपला प्रवास करीत आहे.

मूर्च्छित पडलेल्या धनेश्वर वकिलांकडे त्यानें ढुंकूनदेखील पाहिलें नाहीं. तो तसाच पुढें चालता झाला. मोर्ले-मिंटो सुधारणा त्याला भेटायला आल्या, 'न भूतो न भविष्यति' अशा दिल्ली दरबारानें त्याला आमंत्रण दिलें, आपली तुरुंगांतली तपश्चर्या पुरी करून लोकमान्यांनीं गीतारहस्य त्याला अर्पण केलें; या सर्वांचा त्यानें आदरानें स्वकिार केला पण आपली गति मात्र पूर्ववत् चालू ठेविली. गीतारहस्याचा स्वीकार करीत असतांना महाराष्ट्रांत सामर्थ्य-संपादन, धर्मसंघटन इत्यादि बाबतींत जागृति करणारी स्वामी वसुधानंदांचीं व्याख्यानें त्याला ऐकूं येऊं लागलीं. समर्थसंप्रदायाप्रमाणें वागणारा त्याचा शिष्यवर्ग त्याच्या डोळयाला दिसूं लागला. पण थांबणें हा शब्द काळाच्या कोशांत नव्हता. तो पुढेंच चालला व गोखले, मेथा, दादाभाई, टिळक यांच्या भेटीसाठीं स्वर्गांत जाणाऱ्या दासबाबूंनाहि त्यानें पाहिलें.

३

स्वामी वसुधानंद ओरीमध्यें एकांतांत ध्यानधारणेकरितां बसले होते. बाहेर घाटावर गुरुद्वादशीकरितां आलेल्या यात्रेकरूंची मुंग्यांप्रमाणें रांग लागली होती. देवळांतील घंटा सारखी खणखण वाजत होती, व 'श्री गुरु-देवदत्त' हें नामस्मरण अखंड ऐकूं येत होतें. स्वामींच्या पुढें दत्ताच्या पादुका होत्या; पण त्यांचें लक्ष पादुकांपेक्षां हातांतील फोटोकडेच होतें. दुरून जर कुणी स्वामींना पाहिलें असतें तर त्यांच्या हातांतील फोटो एखाद्या देव-तेचा अगर मूर्तीचा आहे असेंच त्यांना वाटलें असतें. पण त्या फोटोंत दत्ता-प्रमाणें तीन तोंडें दिसत नव्हतीं. दोनच चेहरे दिसत होते. तो देवाचा फोटो नसून देवीचा फोटो होता; आणि त्या देवीचें स्वरूप महिषासुरमर्दि-नीचें नसून मांडीवर तान्हें बाळ घेतलेल्या गृहलक्ष्मीचें होतें. फोटोकडे पाहतां पाहतां स्वामींच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. ते गहिंवरून उद्गारले,

" सोळा वर्षें झालीं, मी संसार सोडला; पण संसार कांहीं मला सोडत नाहीं. हा फोटो अजून पाहावासा वाटतो; तो पाहिला कीं अजून रडूं येतें. असें कां व्हावें बरें ? सोळा वर्षांत स्वामी वसुधानंद म्हणून मी प्रसिद्ध झालों. सगळ्या पृथ्वीवर माझें प्रेम आहे म्हणून मीं ' वसुधानंद ' नाव घेतलें, असें लोकांना व शिष्यांना वाटतें. पण त्या नांवाची स्फूर्ति अफाट पृथ्वीपेक्षां या फोटोंतील टीचभर जिवानें—आईच्या मांडीवर खेळणाऱ्या या तीन महिन्यांच्या वसुधेनें—दिली असें सांगितलें तर तें कुणाला खरें तरी वाटेल का ? तीन महिन्यांचें हें फूल आगगाडीखालीं चिरडून, देवाधिदेवा, तूं काय मिळवलेंस ? अज राजाच्या वेळीं इंदुमतीसारख्या कोमल पुष्पाला स्वर्गी नेण्याकरितां नारदाच्या वीणेवरील पुष्पमाळा देवाला टाकतां आली; आणि माझ्या वसुधेसारख्या फुलाला मात्र आगगाडीखालीं—! कुठें तें कोमल फूल आणि कुठें ती —"

बाहेर पावलें वाजल्यासारखीं वाटलीं. वसुधानंदांनीं फोटो तत्काळ आपल्या छाटीखालीं लपविला. ते मनात म्हणत होते, ' लोक मला पूर्णपणें विरक्त समजतात; पण खरें काय तें या फोटोलाच माहीत ! ' " कोण आहे बाहेर ? " स्वामींनीं विचारलें.

" मी तो राष्ट्रानंद; माझे पूर्वाश्रमींचे एक स्नेही आपणाला भेटायला आले आहेत. " बाहेरून उत्तर आलें.

" या, आंत या " स्वामी म्हणाले. दोघे तरुण—एक संन्यासी व एक गृहस्थ—आंत आले. स्वामींनीं दोघांनाही प्रेमपूर्वक बसावयाला सांगितलें.

स्वामी—तुम्ही आमच्या राष्ट्रानंदाचे स्नेही वाटतें ?

गृहस्थ—होय, गतवर्षी तो न् मी बरोबरच बी. ए. झालों. आम्ही एकाच गांवचे; अगदीं सीवशेजारी.

स्वामी—आज इकडे गुरुद्वादशीला आलां वाटतें ? देवदर्शनाची इतकी आस्था सध्यांच्या सुशिक्षितात फार क्वचित् आढळते.

गृहस्थ— देवदर्शन तर खरेंच ! पण आपल्यासारख्या साधूंचें दर्शन झाल्यामुळें दुधांत साखर पडली !

स्वामी—आम्ही क्षुद्र माणसें हातून काय होईल ती समाजरूपी सच्चितानंदाची सेवा करतों.

गृहस्थ—विद्येप्रमाणें सेवाहि विनयानें शोभते. आज स्वामी वसुधानंदांचें कर्तृत्व माहीत नाहीं असा महाराष्ट्रांत कोण आहे ? आपण देशासाठीं वकिलीची पगडी फेंकून जटाजूट धारण केला नि तलम मलमल झिडकारून अंगाला राख फांसली हें प्रत्येकजण जाणतो. लक्ष्मीला लाथ मारून आपण सेवेचें कंकण हातांत बांधलें आहे; आपण ठिकठिकाणीं आखाडे स्थापून तरुण पिढीचें मनगट जोरदार करण्याची खटपट केली आहे; हिंदुधर्ममंडळें स्थापून धार्मिक उन्नतीचा मार्ग दाखविला आहे ! आमचे राष्ट्रानंद तुमचे शिष्य झाल्यास सहा महिने झाले असतील नाहीं ?

स्वामी—राष्ट्रानंद खरोखर फार कर्तबगार आहेत. माझे शिष्य आहेत म्हणून सांगतों असें नाहीं.

गृहस्थ—(हंसत) कर्तबगार तर खरेच. स्वारीनें सहा महिनेपर्यंत आपण कुठें आहों याचा सुगावाच लागूं दिला नाहीं कुणाला ! अगदीं अलीकडे कळलें, कीं ते आपल्याबरोबर असतात म्हणून. पण स्वामीजी मला एक शंका आहे.

स्वामी—खुशाल विचारा ! तुमच्यासारख्या तरुणांनीं या प्रश्नांचा विचार करावा हीच माझी इच्छा आहे.

गृहस्थ—तुम्हीं करतां हें सगळें कोणासाठीं ?

स्वामी—समाजासाठीं.

गृहस्थ—मग समाजालाच त्यामुळें त्रास होत असला तर ?

स्वामी—समाजाला त्रास ?

गृहस्थ—आडपडद्यानें कशाला बोललें पाहिजे ? हा सूर्य आणि हा जयद्रथ केलें म्हणजे बरें ! राष्ट्रानंद तुमच्यापुढें बसलाच आहे. त्याची बायको आतां घाटावर स्नानाला गेली आहे. तिला घेऊन येतों म्हणजे झालें.

राष्ट्रानंद—(बावरून) काय, ती आली आहे इतर मंडळीबरोबर ?

स्वामी—राष्ट्रानंद, तूं पत्नीची परवानगी घेऊनच इथें आलास ना ?

राष्ट्रानंद—होय.

गृहस्थ—पत्नीची परवानगी ! राजानें राणिला मी लढाईवर जातों म्हणून सांगितल्यावर रडण्याखेरीज तिच्या बापडीच्या हातांत काय आहे !

स्वामी---या राष्ट्रनंदाची बायको याच्यासाठीं रडत असते म्हणतां ?

गृहस्थ---देवाच्या मूर्तीच्या पायावर डोकें ठेवून जर ती रडत बसली असती तर ती मूर्ति आंसवांनीं भिजून तिच्याप्रमाणेंच कृश झाली असती. नवरा विरक्त झाला; पण तो कुठें गेला हें बिचारीला माहीत नाहीं. जेवणाच्या वेळीं तो उपाशीं असेल म्हणून ही जेवत नाहीं. हळदीकुंकवाला जायचें असेल तर तो नुसत्या लंगोटीवर रहात असेल म्हणून ही नवें लुगडें नेसत नाहीं !

स्वामी---अरेरे ! गरीब बिचारी मुलगी !

गृहस्थ---स्वामी महाराज, थोडें स्पष्ट बोलतों याबद्दल क्षमा करा. आपण अशा प्रेमळ बायकोला सोडून संन्यास घेतला असता का ?

राष्ट्रनंद---उचलली जीभ न् लावली टाळ्याला ! महाराज काय तुमच्यासारखे संसाराच्या शेणांतले किडेच आहेत वाटतें ?

स्वामी---राष्ट्रनंद, असें रागावूं नये. प्रवृत्ति व निवृत्ति यांचा हा झगडा सनातन आहे.

गृहस्थ---पण समाजसेवा करायला संसार सोडला पाहिजे असें थोडेंच आहे !

राष्ट्रनंद---तुम्हीं संसारांतल्या लोकांनीं काय दिग्विजय लावले आहेत असे ? कैदी आणि संसारी मनुष्य सारखाच.

गृहस्थ---आम्ही जगांतले कैदी असलों तर निवृत्तीचें स्तोम माजविणारे तुम्हीं अंदमानांतील कैदी आहां.

स्वामी---कडू शब्दांनीं शेवट कांहीं गोड होत नाहीं.

गृहस्थ---त्या बिचारीला मरणाखेरीज आतां दुसरें कांहींच गोड वाटणार नाहीं. स्वामीमहाराज, प्रेम हें धर्माचें मूळ आहे ना ?

स्वामी---अलबत्, साधुसंतहि जगावर प्रेमच करतात. 'वसुधैव कुटुंबकम्' अशी त्यांची वृत्ति असते.

गृहस्थ---मग जगावर प्रेम करायला निघालेल्या या तुमच्या राष्ट्रनंदानें आपल्यावर प्रेम करणाऱ्या प्रेमळ पत्नीचा त्याग करणं योग्य आहे काय ?

राष्ट्रनंद---हजारों जीवांपेक्षां एका जीवाची योग्यता जास्ती नाहीं, हें साधें अंकगणित तुला बी. ए. होऊनहि समजत नाहीं ?

गृहस्थ---मी तर नुसताच बी. ए. झालों आहें. तूं भगवा बी. ए. असूनहि ' आधीं कळस मग पाया ' असें आपलें वर्तन होत आहे हें तुला समजूं नये ना ? कौटुंबिक प्रेमाचा पाया खणून काढून तूं विश्वप्रेमाचें मंदिर उभारणार आहेस. झाडाच्या मुळावर कुऱ्हाड चालवून त्याच्या फळांनीं हजारों माणसांची क्षुधा भागविण्याची ईर्ष्या धरीत आहेस. तुझा शांतपणा तुझ्या बायकोचा जीव घेत आहे. तुला प्रत्यक्षच दाखवितों तुझा जुलूम !

राष्ट्रानंदाचा स्नेही त्या आवेशाच्या भरांत ओरीबाहेर गेला व थोड्याच वेळांत एका सोळासतरा वर्षांच्या मुलीला घेऊन परत आला. स्वामी व राष्ट्रानंद दोघेहि विचारमग्न होऊन बसले होते.

गृहस्थ—स्वामीजी, ही पहा राष्ट्रानंदाची बायको.

स्वामी—राष्ट्रानंद, तुमची इच्छा असेल तर पुनः संसारांत पडा, माझी हरकत नाहीं.

राष्ट्रानंद---समुद्राला मिळालेली नदी कांहीं पुन्हां परत पर्वताकडे येत नाहीं. आपल्या आज्ञेप्रमाणें वागण्याची मी शिष्य होतांना शपथ घेतली आहे. आपण मला पुन्हा संसाराच्या तुरुंगांत कोंडून ठेवणार ?

स्वामी—संसार हा समुद्र आहे. त्यांत रत्नें आहेत व नक्रहि आहेत. त्यांतून उत्तीर्ण झालेल्या मनुष्याला मी पुन्हां त्यांत उडी टाकायला कसें सांगूं ?

गृहस्थ—मग पतिविरहाचा धोंडा गळ्यांत बांधल्यामुळें ही मुलगी त्यांत बुडाली तर हरकत नाहीं ?

राष्ट्रानंद---मी मेलों असतों तर हिनें काय केलें असतें ?

ती मुलगी थर थर कापत होती. मान थोडीशी वर करून ती म्हणाली, " इडा पिडा टळो न् अमंगळ पळो. "

स्वामी—राष्ट्रानंद, संन्यासी होऊन तूं अनुराग सोडलास; पण तुझा राग कायमच आहे.

गृहस्थ---राग असून जर मोक्षसाधन करतां येतें तर अनुराग असूनहि तें कां करतां येऊं नये ?

स्वामी---मुली, तुझ्या नवऱ्यानें धर्माच्या सेवेचा मार्ग पत्करला आहे. लढाईवर जाणाऱ्या सैनिकाला त्याच्या बायकोनें अडविणें हें बरें का ?

ती मुलगी एकदम उसळून म्हणाली, " नवऱ्यानें बायकोलाहि लढाईवर न्यावी. मी यांच्याजवळ नसलें तर यांची सेवासुश्रुषा कोण करील? हे पोटभर जेवले न जेवले हें कोण पाहील? यांचें कपाळ दुखूं लागलें तर तें कोण चेपील? यांना करमेनासें झालें म्हणजे गाणें म्हणून यांना आनंदित कोण करील? पतीचा सहवास नसलेली पत्नी व पाण्याबाहेर टाकलेली मासोळी यांत फरक काय?"

स्वामी---राष्ट्रानंद, तुझें काय म्हणणें आहे?

राष्ट्रानंद---टाकलेला संसार हें वमन आहे. त्याचें पुन्हां मी आपण होऊन सेवन करणार नाहीं. तथापि माझें खरें कर्तव्य काय हेंच मला कळेनासें झालें आहे. आपण दाखवाल त्या मार्गानें जायला मी तयार आहें.

स्वामी---मुली, याची इच्छा नसतांना याला संसारांत पडण्याची आज्ञा मी कोणत्या तोंडानें देऊं?

" महाराज, आपल्या एकुलत्या एक मुलीचा नवरा संन्यासी झाला असता तर आपण त्याला काय उपदेश केला असता?" त्या मुलीनें विचारलें.

स्वामी गोंधळून गेले, फोटोंतलि चार महिन्यांची वसुधा मोठी होऊन त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. 'माझी लाडकी वसुधा जर आज जिवंत असती तर या मुलीएवढीच दिसली असती. तिच्या नवऱ्याला आपण आपल्या शिष्यवर्गांत दाखल करून घेतलें असतें काय? जांवयाला जरीच्या रुमाला-ऐवजीं भगवीं वस्त्रें देण्याला आपला हात पुढें झाला असता काय? 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' या आशीर्वादाऐवजीं 'निपुत्रिका वियोगिनी भव' हे शब्द आपल्या मुलीला उद्देशून उच्चारण्याला आपली जीभ धजली असती काय? लग्नाच्या वेळीं ज्या हातानें कन्या जांवयाला दिली, ज्या हातानें त्या जोडप्याच्या तोंडांत साखर घातली त्याच हातानें तिला जांवयापासून तोडणें, त्याच हातानें कन्येच्या संसाराची माती करून ती तिच्या तोंडांत घालणें जगांत फत्तराच्या हातून देखील होणार नाहीं. इत्यादि विचार त्यांच्या क्षुब्ध हृदयसागरांत उसळूं लागले, 'ही माझी मुलगी असती तर मी काय केलें असतें?' ह्या प्रश्नानें त्यांना एक नवीनच दृष्टि दिली.

राष्ट्रनंदाकडे वळून ते म्हणाले, "राष्ट्रनंद तुझा माझ्यावर पूर्ण भरंवसा आहे ना? मी तुझ्या कल्याणाचीच गोष्ट सांगेन अशी तुझी खात्री आहे ना?"

राष्ट्रनंद– तुफान वादळांत नौकेला कर्णधाराखेरीज दुसऱ्या कुणाचा आधार असणार? महाराज, पत्नीचा त्याग करणें हें पाप आहे हें मला कळतें; पण वैराग्याचा मार्ग संसारापेक्षां अधिक श्रेयस्कर असल्यामुळें तो टाकून देणें हेंहि पाप आहे असें मनाला वाटतें. 'किंकर्म किमकर्मेति' अशी अर्जुनाप्रमाणें माझी स्थिति झाली आहे. आपण जी आज्ञा कराल, जो मार्ग दाखवाल तो मला शिरसा मान्य आहे.

वसुधानंद––मग तूं आपल्या पत्नीचा स्वीकार कर. धर्मपत्नीचा त्याग करून तुला धर्मसेवा करतां येणार नाहीं. जीवितरथाच्या प्रगतीला पत्नी अडथळा आणते असें आम्हीं म्हणतों; पण रथाचा कणा मोडला असतांना आपला हात तिथें घालून कैकेयीप्रमाणें ती रथाचें व पतीचें संरक्षण करणार नाहीं असें कुणी म्हणावें?

राष्ट्रनंद––महाराज, आपल्या आज्ञेबाहेर मी नाहीं. पण आपल्या कुटुंबांत गुरफटून जाण्यापेक्षां 'वसुधैव कुटुंबकम्' असें वर्तन ठेवणें अधिक श्रेयस्कर असें आपलें म्हणणें होतें. आपली आज्ञा त्या उपदेशाच्या विरुद्ध नाहीं का?

वसुधानंद––त्या उपदेशानेंच मला ही आज्ञा करावयाला लाविली. 'वसुधैव कुटुंबकम्' अशी वृत्ति मला ठेवायची आहे म्हणून ही मुलगी माझी आहे असें मानून हिच्या विनंतीचा मी विचार केला. माझ्या मुलीच्या नवऱ्याला मी कधींहि संन्याशी होऊं दिलें नसतें; मग माझ्या कार्याच्या उत्साहांत हिच्या प्रेमाकडे मीं दुर्लक्ष केलें तर तें 'पर दुःख शीतळ' असेंच होईल. 'वसुधैव कुटुंबकम्' याचा खरा अर्थ मला आज समजला. धर्मसेवेसाठीं मजकडे येणाऱ्या माणसांपैकीं कित्येकांना प्रेमळ आईबाप असतात, कित्येकांना त्यांच्यासाठीं झुरणाऱ्या व जीव पाखडणाऱ्या बायका असतात. 'वसुधैव कुटुंबकम्' अशी वृत्ति ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसानें आईबापांच्या अगर पत्नीच्या दृष्टीनें पहावयाला नको काय?

स्वामींच्या या प्रेमळ व उदार उद्गारांमुळें ती मुलगी अगदीं गहिंवरून गेली. तिनें स्वामींचे पाय धरले व सद्गदित स्वरानें ती म्हणाली, "महाराज, माझें पतिदैवत मला परत देऊन आज माझ्या संसाराला आपण देवळाचा

पवित्रपणा आणला. आपण जर माझी विनंति नाकारली असती तर मला हा संसार स्मशानासारखा झाला असता. मी इथें गुरुद्वादशीला आलें ती जिवाचें बरें वाईट करून घेण्याचा निश्चय करूनच आलें. आपण जर माझें दुःख दूर केलें नसतें तर कृष्णामाईच्या कुशींत शिरून मी त्याला कायमची जलसमाधि दिली असती–” तिनें पदराखालून एक फोटो काढला व आनंद आणि दुःख यांनीं मिश्रित अशा स्वरानें ती म्हणाली, “ आई, घटकेपूर्वीं तुझ्याबरोबर आगगाडीखालीं मी चेंगरून मेलें असतें तर बरें झालें असतें असें मला वाटत होतें. आतां मला जगावेसें वाटतें ! याबद्दल मला तूं आपलपोटी नाहीं ना म्हणणार ? बाबा, घटकेपूर्वीं तुमच्या वसुधेला उभ्या जगांत कोणी नाहीं म्हणून मी तुमचा धांवा करीत होतें ! पण आतां स्वामी-महाराजासारखे मायेची पांखर घालणारे मला मिळाले आहेत हें पाहून तुम्ही कुठेंहि असलां तरी तुम्हांला आनंदच होईल. ”

तिचे हे शब्द ऐकतांच स्वामी कावरे बावरे होऊन उठले. त्यांनीं तिच्या हातांतील फोटोकडे पाहिलें व एकदम “ वसुधे, बाळ वसुधे ! ” म्हणून तिला जवळ ओढलें. क्षणार्धांत वसुधेचें मस्तक त्यांच्या डोळयांतील अश्रु-धारांनीं ओलेंचिंब झालें. स्वामींनीं वसुधेला जवळ ओढलें त्यावेळीं त्यांनीं छाटीच्या आत ठेवलेला फोटो खालीं पडला. राष्ट्रानंद व त्याचा स्नेही या दोघांनाहि तो फोटो व वसुधेच्या हातांतील फोटो एकच आहेत हें तत्काळ कळून चुकलें.

आनंदाचा भर ओसरतांच स्वामी म्हणाले, “ राष्ट्रानंद, माझी वसुधैव कुटुंबकम् वृत्ति जागृत होती म्हणूनच कन्येच्या संसारांत माती कालविण्याचें व तिच्या हत्येचें हीं दोन्ही पापें माझ्या हातून झालीं नाहींत. तुझी पत्नी–ही वसुधा–ही माझी एकुलती एक मुलगी. आगगाडीच्या अपघातांत माझ्या पत्नीबरोबर हीहि मरण पावली असें कळतांच सोळा वर्षांपूर्वीं मी संन्यास घेतला. ‘ वसुधानंद ’ या माझ्या नांवाकडे पहा. हें नांव माझ्या लाडक्या मुलीचें स्मृतिचिन्ह म्हणूनच मी धारण केलें. ”

स्वामींचें भाषण संपतें न संपतें तोंच एक प्रौढ विधवा धावत धावतच त्यांच्या ओरींत आली. तिला पाहतांच वसुधा आनंदानें म्हणाली, ‘मावशी, मावशी, तुझा दत्त नवसाला पावला हं, आज मला इकडचे पाय पुन्हां

दिसले. एवढेंच नव्हे तर ते वडिलांच्या वरदहस्तानें परत मिळाले. मावशी, देव दयाळू आहे नाहीं ग ? " गळा व डोळे भरून आल्यामुळें वसुधेला पुढें बोलवेना. तिनें मावशीच्या कुशींत डोकें खुपसलें व ती आनंदातिरेकानें स्फुंदूं लागली. स्वामींनीं कुतूहलानें विचारलें, ' मावशी माझी ही मुलगी तुम्हांला कुठें सांपडली ? '

मावशी म्हणाल्या, " महाराज, वसुधेचें कन्यादान करण्याचा अधिकार मी बळकावला म्हणून देव कोपला व हिचा नवरा हिला सोडून गेला असें मला वाटूं लागलें होतें. आज आपण जांवयाला कन्यादान करण्याऐवजीं कन्येलाच जांवई परत मिळवून दिला आहे; तेव्हां देवाच्या दृष्टीनें तरी मी निरपराधी आहें. "

स्वामी—लक्ष्मणानें रानांत टाकलेल्या सीतेचें जसें गंगा व पृथ्वी यांनीं पालन केलें तसें तुम्ही माझ्या वसुधेचें केलें आहे. त्यांत तुमचा अपराध कसला?

मावशी—अपराध गायवासरांची ताटातूट करण्याचा; पण, तो प्रेमानें केला महाराज. मूल ना बाळ अशी मी एकटीच जगांत होतें. पंढरपुरला जा, नरसोबाच्या वाडीला जा, असें करून मी काळ कंठीत होतें. पण मनाची तळमळ कांहीं केल्या कमी होईना. अशीच एकदां मी आगगाडींतून पंढरपुराहून परत येत होतें. डब्यांत माझ्या समोर एक बाई व त्यांचे भाऊ बसले होते. बाईच्या मांडीवर एक मुलगी होती. त्या तिच्या हातांत एक फोटो देऊन खेळवीत होत्या. त्या मुलीचे मी किती मुके घेतले, तिला किती खेळविलें हें सांगून सोय नाहीं. चार घटकांत चार जन्मांची तिची माझी ओळख आहे असें मला वाटूं लागलें. आम्ही बोलत चालत असतांनाच आमच्या आगगाडीची दुसऱ्या गाडीशीं टक्कर झाली. नि क्षणांत त्या गाडीला व भोंवतालच्या जागेला स्मशानाचें स्वरूप आलें. त्या धक्क्यासरशी मी बेशुद्ध झालें. थोड्या वेळानें डोळे उघडून पहातें तों मुलगी माझ्या मांडीवर बसली असून रडत आहे. तो फोटो मात्र तिच्या हातांतच होता. जवळच कितीतरी माणसें मरून पडलीं होतीं. त्यांत मुलीची आई व मामाहि होते. या मुलीचें रक्षण मीच करावें अशी देवाची इच्छा होती. म्हणूनच मला त्यानें अशा प्रळयांत जिवंत ठेविलें व मुलीला माझ्या मांडीवर दिलें असें माझ्या मनानें घेतलें. तेव्हांपासून ही वसुधा माझा जीव कीं प्राण होऊन बसली आहे. मी आपल्या-

पासून मुलगी तोडून आपल्याला दुःख दिलें. याची कोणत्या तोंडानें क्षमा मागूं ?

स्वामी म्हणाले, “ क्षमा कसली मागायची यांत ? ईश्वरी नेमानेमा-प्रमाणें सर्व गोष्टी घडायच्या तशा घडल्या ! ” नंतर ते राष्ट्रानंदाकडे वळून म्हणाले, “ पाहिलेंस, मावशींनीं त्या भयंकर अपघातांत एका परक्या मुलीला जवळ केलें याचें कारण तरी काय ? वसुधैव कुटुंबक वृत्ति हेंच. याच वृत्तीनें वसुधेचें ती तीनचार महिन्यांची असतांना आगगाडीच्या अपघातापासून व आज आत्महत्येपासून रक्षण केलें. सगळ्या प्रवृत्तींचें व निवृत्तींचें सार एकच आहे, नाहीं का ? ”

तिचे डोळे पाण्यानें भरले होते. कुणीतरी विचारलें, 'काय झालं?'

ती रडत रडत म्हणाली, 'माझा नवा फ्रॉक फाटला आतां तो शिवला तरी वाईटच दिसणार!'

* * *

या गोष्टीला एक तप होऊन गेलें.

तिचे डोळे पाण्यानें भरले होते. कुणीतरी विचारलें, 'काय झालं?'

ती रडत रडत म्हणाली, 'माझा हात भाजला. पातळ जळलं त्याचं कांहीं नाहीं. पण माझा हात—आतां जन्मभर तो विद्रूप दिसणार!'

* * *

या गोष्टीला एक तप होऊन गेलें.

तिचे डोळे पाण्यानें भरले होते. कुणीतरी विचारलें, 'काय झालं?'

ती रडत म्हणाली, 'माझा बाळ—'

तिला पुढें बोलवेना. स्फुंदत स्फुंदत मोठ्या कष्टानें ती उद्गारली, 'मला कपडे नकोत, दागिने नकोत, कांहीं नको. एक बाळ हवा—देवा, माझं औक्ष घे. पण माझ्या बाळाला तें भरपूर दे!'

" सरकारस्वारीनें असें विचारांत पडण्याचें कारण नाहीं. आपणाकडून होकार मिळण्याचा अवकाश, कीं एक सोडून हजारों मुली आपल्या पायांवर लोटांगणें घालीत येतील. रंभा–उर्वशी, गार्गी–मैत्रेयी, कसली वाटेल तसली मुलगी मिळेल. "

वृद्ध कारभाऱ्यांचें शेवटचें वाक्य ऐकून तर दीनबंधु महाराजांना हंसूंच कोसळलें. ते हंसत हंसत म्हणाले, " आमच्या संस्थानांत स्त्रीशिक्षणाचा फारसा प्रचार झाला नसतांनाहि गार्गी–मैत्रेयी निर्माण झाल्या आहेत म्हणा-वयाच्या ! पण असल्या तत्त्ववेत्त्या मुलीशीं लग्न करून माझा निभाव कसा लागणार ? अशा गार्गीला घरांत आणली, कीं पतीनें गर्गाचार्यांच्या मुहूर्ता-वर घर सोडायला पाहिजे. "

" हः हः हः ! राजकुमारांच्या पाठशाळेंत श्रीमंतानीं ज्योतिःशास्त्राचें देखील चांगलेंच अध्ययन केलेलें दिसतें. माझें म्हणणें इतकेंच कीं, आपलें राज्य अंगठीच्या खड्यासारखें असलें तरी त्यांत आपणांला पाहिजे तसें वधूरत्न हां हां म्हणतां मिळेल. "

" हां हां म्हणतां ? समुद्रांतल्या रत्नासाठीं पाणबुड्याना पाताळाचा ठाव पहावा लागतो; भूमीच्या गर्भांतील रत्नासाठीं माणसांना खोल खाणी खणाव्या लागतात; मग माणसांतलेंच रत्न, कारभारीसाहेब, डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत आपण कसें संपादन करणार ? "

" हः हः हः ! महाराज काव्यहि चांगलेंच पढले आहेत. वा ! काय उपमा न् काय अलंकार ! माझ्यासारखा बुड्ढा घोडा काय उत्तर देणार या रत्नाच्या प्रश्नाला ? "

" कारभारीसाहेब, जगांत सुखासुखी मिळणारें एक देखील रत्न नाहीं. यःकश्चित् गाडीवाल्याच्या हातांत नाचणारा चाबूकच पहा ! हें रत्न पैदा करायला देवदानवांना समुद्र चौदा वेळां घुसळावा लागला. "

" इंग्रजी घडाघड बोलत असूनहि महाराजांचें पुराणांवर इतकें प्रेम आहे

ही आनंदाची गोष्ट आहे, याला म्हणावें धर्मनिष्ठ! असल्या राजरत्नाची गृहलक्ष्मी होईल ती भाग्यवानच म्हटली पाहिजे!"

कारभारी साहेबांच्या राजनिष्ठ भाषणांचा गेल्या महिन्यांत राजकुमारांच्या पाठशाळेंतून आल्यापासून दीनबंधु महाराजांना पुरा परिचय झाला होता. ते हंसत हंसत म्हणाले, "पण ही गृहलक्ष्मी शोधायची कोठें हेंच मला कोडें पडलें आहे. ती संपत्तीच्या सागरांत वास करीत असेल, कीं विद्येच्या गिरि-शिखरावर राहत असेल—कीं,"

'यात कोडें कसलें आहे महाराज? आमचा एक जुना श्लोक आहे. तो आहे आपला वधूपक्षाचा; पण मोठा मार्मिक आहे. काय बरें तो? हं, 'मिष्टान्नमितरे जनाः' असा त्याचा शेवट आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, मुलगी रूपाकडे, बाप विद्येकडे, आई पैशाकडे व आतइष्ट कुळाकडे पाहातात. याच चार चाळणी आपण वधूपरीक्षेला लावायच्या. प्रथमतः मुली पाहून त्यांतल्या सुरूप एका बाजूला काढावयाच्या! या सुभद्रांपैकीं कुबेराच्या मुली शोभतील त्याच निवडावयाच्या. या दोन चाळणींतून एकापेक्षां अधिक मुली राहिल्याच तर चंद्र सूर्याशीं कुणाचें नातें लागतें अगर सरस्वतीचा वरदहस्त कुणावर आहे याची चौकशी करायची! या चार तटांतून बाले-किल्ला गांठणारी मुलगीच राणीपदाला योग्य होईल."

"कारभारी, तुम्ही जग वधूपरीक्षा कशी करतें तें सांगितलेंत. पण रूप, द्रव्य, कुल व विद्या या चतुरंगबलानें युक्त असलेली मुलगी संसाराच्या समरांगणात विजय मिळवीलच असें मला वाटत नाहीं. या चारी गोष्टी असूनहि तिचें हृदय उदार व कोमल असेलच असा नियम नाहीं. मुख चंद्रासारखें असलें म्हणून हृदयात तप्त जगाला शीतलता देण्याचा धर्म असेलच म्हणून कुणी सांगावें? घरीं पाण्यासारखा पैसा असला म्हणून स्वभाव अग्नीसारखा तापट असत नाहीं असें थोडेंच आहे! कुळाविषयीं म्हणाल तर कर्ण सांगतो तेंच खरें, 'दैवायत्तं कुले जन्म!' शत्रूशीं वाघा-प्रमाणें लढणाऱ्या बाजीरावाच्या कुळांतच पळपुट्या बाजीराव जन्माला आला. राहतां राहिली विद्या! विद्येच्या उदयानें हृदय सुप्रकाशित होतें खरें; पण पुष्कळ वेळां सरस्वती जिव्हाग्रींच वास करीत असते. जिभेचें गूळ हृदया-पासून फार दूर असतें हें मीं काय तुम्हांला सांगितलें पाहिजे?"

दीनबंधु महाराजांचें हें छोटें व्याख्यान ऐकून कारभारी सर्दच झाले. एखाद्या संस्थानिकाची गोरीपान मुलगी आणली कीं, मुहूर्त ठरला अशी महाराजांच्या लग्नाच्या बाबतींत त्यांची समजूत होती. पण महाराजांचें हें भाषण ऐकतांच त्यांना बोहल्यावर चढविणें म्हणजे हिमालय चढून जाणें आहे अशी त्यांची खात्री पटली. शिवाय दीनबंधु महाराजांना मुलगी देण्यासाठीं राजधानींतील मोठमोठ्या सरदार-सावकारांत अहमहमिका लागली होती. हे सर्व लोक पाण्यासारखा पैसा खर्च करायला तयार होते व त्यांत आपले हात सहज ओले होणार अशी कारभाऱ्यांना आशा होती. पण महाराजांची वधूची कल्पना पाहतांच संस्थानिकांच्या लग्नाच्या समुद्रांत बुडून आपण कोरडेच्या कोरडेच राहाणार असें त्यांना वाटूं लागलें. शेवटीं कांहीं तरी बोलावयाचें म्हणून ते म्हणाले, " महाराजांचे विचार फार प्रगल्भ आहेत पण–पण—"

" पण काय ?"

" पण ? आपण म्हणतां ही वधूपरीक्षा नव्हे, हृदयपरीक्षाच आहे. अन् हृदयपरीक्षा एकट्या परमेश्वरालाच करतां येते. "

" मनुष्यांत परमेश्वराचा अंश आहेच ना ? मग त्याला हृदयपरीक्षा कां करतां येणार नाहीं ? संसार शरीरांनीं होत नसतो; हृदयांनींच होतो ! सोन्यासारख्या कान्तीला भुलून मी कृष्णहृदयाचा स्वीकार केला, अगर कोमल तनुलतेला मोहून जाऊन मी कठोर मन पदरांत घेतलें तर तें जन्माचें शल्य होणार नाहीं का ? संसार-रथांत पतिपत्नी हीं रथी सारथी असतात. तीं कृष्णार्जुनाप्रमाणें असलीं तर यश मिळते; शल्यकर्णाप्रमाणें असलीं म्हणजे पराक्रम मातीमोल होऊन जातो. आमचें हें चिमुकलें संस्थान सुखी व्हावें म्हणून मीं हजारों मनोराज्यें केलीं आहेत ! पण पुरुषांचीं मनोराज्यें सफल होणें वा न होणें हें त्याला मिळणाऱ्या पत्नीवर अवलंबून असतं. "

" खरें आहे. " जड स्वरानें मनांतल्या मनांत इंग्रजी शिक्षणाच्या नांवानें खडे फोडीत कारभारी म्हणाले.

दीनबंधु थोडा वेळ विचारमग्न होऊन बसले होते. वादळांत सांपडलेल्या नौकेच्या कर्णधाराला ध्रुव दिसावा त्याप्रमाणें त्यांना एकदम कल्पना सुचली. त्यांच्या चेहऱ्यावरील चिंतेचा काळिमा या विजेप्रमाणें चमकणाऱ्या विचारानें नाहींसा झाला. ते म्हणाले, " असें करा. सगळ्या संस्थानांत अशी

दवंडी पिटवा, कीं राजेसाहेब संस्थानांतीलच योग्य अशी वधू पाहून विवाह करणार आहेत. करिता आजपासून आठवे दिवशीं ज्यांना ज्यांना आपल्या मुली दाखवायच्या असतील त्यांनीं सकाळीं सात वाजतां सरकारी इस्पितळांत हजर व्हावें. "

" राजवाड्यांत ना ? आपण चुकून इस्पितळांत म्हटलेंसें वाटतें. "

" चुकून नाहीं म्हटलें. इस्पितळांत त्यांना बोलवा. " राजेसाहेबांचें बोलणें वेड्याच्या इस्पितळांतून आलेल्या माणसासारखें कारभाऱ्यांना वाटलें; पण करतात काय ? ' सत्तेपुढें शहाणपण नाहीं ' असें पुटपुटत दवंडीचा हुकूम द्यावयाला ते निघून गेले.

२

खेडोपाडीं दवंडी पिटली गेली व संस्थानांतल्या जनसमुद्रावर विस्मयाचे तरंग, कुतूहलाचे तुषार व आश्चर्याच्या लाटा यांची एकच गर्दी उसळली. राजवाड्यात मुली पहायच्या सोडून इस्पितळाची जागा राजेसाहेबांनीं मुक्रर कां केली, याचा मी मी म्हणणारांनाहि अंदाज बांधतां येईना. दोन आशाळ-भूत सावकारांमध्यें यासंबंधानें चर्चा चालली असतां एक म्हणाला, "राजे-साहेबांना वेड लागलें आहेसें दिसतें. तरी बरें, स्मशानांत अमावास्येच्या रात्रीं मुली दाखवायला आणा म्हणून सांगितलें नाहीं ! पण करणार काय म्हणा ? अडला हरि न् गाढवाचे पाय धरी ! "

दुसरा उत्तरला, " अहो, राजेसाहेबांची निंदा करतां करतां तुम्ही स्वतः-चीच करूं लागलांत ! आमचे जांवई व्हा म्हणून गाढवाचे पाय धरणा-ऱ्यांची गणना त्याच जातींत व्हायची ! राजेसाहेबांनीं मुली पाहण्यासाठीं इस्पितळाची जागा नक्की करण्यांत फार दूरदर्शीपणा दाखविला आहे. राजे-साहेबाच्या बाबतींत रात्र थोडी न् सोंगें फार अशी स्थिति होणारच ! म्हणजे वर एक न् वधू फार. एकीची निवड झाली कीं निराशेनें बाकीच्या बेशुद्ध होणार ! त्यांना लवकर शुद्धीवर आणण्यासाठीं हा समारंभ इस्पितळांत घडवून आणण्याचें त्यांनीं ठरविलें असावें. एकीला राजेसाहेब व बाकीच्यांना ॲमोनिया मिळणार ! ही खूणगांठ अगदीं बांधून ठेवा. "

वधूपरीक्षेची ही पद्धत नवीच असल्यामुळें जिकडे जावें तिकडे याच

विषयाची चर्चा ऐकूं येऊं लागली. राजेसाहेबांनीं एकदम सगळ्या मुली बोलावल्या आहेत, तेव्हां जुन्या काळच्या स्वयंवरासारखे ते माळ घेऊन या बसलेल्या मुलींत फिरणार कीं काय अशी एकानें शंका काढली. दुसऱ्याला ते बहुधा एखादा पण लावतील अशी कल्पना सुचली. झालें; लगेच त्याचें डोकें चालूं लागलें व राजेसाहेब कोणता पण लावतील याचा शोध त्यानें सुरू केला. ओल्या लांकडावर लवकरच चहा करण्याचा पण त्याचा त्यालाच गावढळ वाटल्यानें त्यानें सोडून दिला. धनुष्यभंग अगर मत्स्यभेद असले पण राजेसाहेब लावतील तर जमलेल्या सर्व मुली ते सहज जिंकतील असें त्याला वाटूं लागलें; कारण भुंवया मोडणें व डोळे मुरडणें या गोष्टी बायकांना कधींच शिकवाव्या लागत नाहींत ! शेवटीं इस्पितळांतल्या रोग्यांचें कण्हणें जिच्या बोलण्यामुळें मधुर वाटूं लागेल तिच्याशींच लग्न करण्याचा राजेसाहेबांचा संकल्प असावा अशी त्यानें आपली समजूत घातली.

मुलींच्या बाबतींत जातपात, रावरंक, यांचा भेद राजेसाहेब, मानणार नाहींत असेंहि जाहीर झालें होतें. लग्नाच्या बाबतींत ‘ येथें पाहिजे जातीचें ’ असें ज्यांचें मत होतें, ते राजेसाहेबांच्या धर्मभ्रष्टपणामुळें त्यांचें संस्थान खालसा होणार असे उद्गार काढूं लागले. राजेसाहेबांना भिकेचे डोहाळे आठवले, असे विचार श्रीमंत नागरिकांच्या मनांत येऊं लागले. ‘ इस्पितळ म्हणजे संस्थानांतील उपवर मुलींच्या खानेसुमारीची जागाच होणार ’ अशी टीका उपवर मुली नसलेल्या लोकांनीं करण्याला सुरुवात केली. यापेक्षां राजेसाहेबांनीं लग्नाची एक लॉटरी कां काढली नाहीं, म्हणजे संस्थानच्या खजिन्यांत भर पडून मुलींवरहि इस्पितळापर्यंत आपली मिरवणूक काढण्याची पाळी आली नसती, अशीहि मल्लिनाथी करण्यास एकजण चुकला नाहीं. राजवाड्यांत बोलावणें असतें तर प्रतिष्ठित लोकच गेले असते; आतां आपल्या रोगट मुली घेऊन वाटेल त्या वाटेवरल्या चोरानें जावें. हिंवतापानें मुलगी कांपत असली तरी राजेसाहेबांना ती भीतीनेंच कांपत आहे असें वाटणार, तापानें एखादीचा चेहरा लाल झाला असला तरी राजेसाहेब तो लज्जेनेंच लाल झाला आहे असें मानणार, मान वर करण्याची शक्ति नसलेली मुलगी विनयशील ठरणार, अशा प्रकारची टीका करीत करीत राजेसाहेबांचे सासरे होऊं इच्छिणारे सर्व धनिक आपापल्या मुलींना सजविण्यांत दंग होऊन गेले,

—३—

सर्व जातींच्या गरीब–श्रीमंत मुलींना येण्याला हरकत नाहीं अशी दवंडी पिटली गेली होती तरी विषाची परीक्षा पहावयाला फारच थोडे गरीब लोक तयार झाले. पाटीभर जरीचे शालू व पेटीभर सोन्यामोत्याचे दागिने ज्यांच्या-पाशीं आहेत त्यांचीच मुलगी राणी होणार, आपली लंकेची पार्वती नेऊन हात दाखवून अवलक्षण कशाला करून घ्या, असेंच प्रत्येक गरीब बाप स्वतःशीं म्हणत होता. एखादा पांढरपेशा सुधारक खेडेगांवातील अस्पृश्यांना शिवण्याची तयारी दाखवूं लागला तर अस्पृश्यच त्याला शिवायला तयार होत नाहींत. तसलाच प्रकार या नवीन स्वयंवराच्या बाबतींत झाला. चंद्रमौळी घरात वाढलेली मुलगी राजवाड्यांत राणी म्हणून जाईल ही कल्पनाच बहुतेकांना पटेना. राजेसाहेबांनीं गोरगरीब लोकांची ही थट्टा तर आरंभिली नाहीं ना, असा किंतुहि कित्येकांच्या मनांत आला. यामुळें हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्याच गरीब मुली नेमलेल्या दिवशीं इस्पितळांत दिसत होत्या. बाकी सर्व ताटावरून पाटावर करणारांच्याच होत्या.

उपवर मुलींचें तें संमेलन म्हणजे अर्धस्फुट कलिकांची माळ अगर तार-कांचा मेळाच होता. जीर्णपर्णें अगर कृष्ण मेघ यांच्याप्रमाणें मधून मधून फिरणारे वृद्ध पालक जर त्या संमेलनात नसते तर जगांत सौंदर्य व आशा यांचेंच साम्राज्य आहे असा पाहणाराला खास भास झाला असता. त्या कुमारिकांच्या डोळ्यांच्या रूपानें तारांगण व गालावरल्या लालीच्या रूपानें उषा, आकाश सोडून खालीं उतरली आहे कीं काय असें वाटण्यासारखाच तो देखावा होता. राजेसाहेबांच्या परीक्षेंत जास्तींत जास्ती गुण मिळविण्या-करतां प्रत्येक मुलीच्या बापानें आपल्या मुलीच्या अंगावर जास्तींत जास्ती दागिने घातले होते. औषधांच्या पात्रांच्या आवाजाखेरीज त्या भव्य इस्पि-तळातील दिवाणखान्यानें आतांपर्यंत दुसरा आवाजच ऐकला नव्हता; पण वधूपरीक्षेच्या निमित्तानें आज मात्र तो मंजुळ कंकणध्वनीनें भरून गेला. प्रत्येक मुलीच्या हृदयात आशा व निराशा यांचें तुमुल युद्ध चाललें होतें. मुलींपैकीं श्रीमंताच्या मुलीनें वेषावरून गरीब दिसणाऱ्या एका मुलीकडे पाहून म्हटलें, “ वत्सले, तूंहि आज इथें आलीस का ? बाकी राजेसाहेबांनीं

मुक्तद्वारच ठेविलें आहे म्हणा ! " लगेच वत्सलेभोंवतीं मुलींचा हा घोळका जमला. श्रीच्या पाठोपाठ शारदा म्हणाली, " पण वत्सले, माणसानें भांडवल पाहूनच व्यापार केला पाहिजे. तूं कशाला आलीस इथें ? ना श्रीसारखी लक्षाधीश ना या सरस्वतीसारखी पदवीधर. बरें, रूपांत तर त्या सुभद्रेच्या पासंगाला देखील लागायची नाहींस, माणसानें आपली पायरी सोडूं नये असें बाई मला वाटतें. प्रेमाप्रमाणें आशाहि आंधळी असते, म्हणूनच तुला येथें येववलें. मी जर तुझ्या जागीं असतें तर येथें यायच्या आधींच लाजेनें अर्धीमेली झाले असते. या एवढ्या मुलींतून तुझी निवड करावयाला राजे-साहेबांना काहीं वेड लागलें नाहीं ! "

वत्सलेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. शारदेचें हें व्याख्यान आणखीहि लांबलें असतें; पण त्या दिवाणखान्यांतील कोपऱ्यांत एक रोगी मूल होतें तें रडूं लागल्यामुळें तिचें बोलणें बंद पडलें.

" कारभाऱ्यांना या रोग्यांना दुसऱ्या खोलींत नेऊन ठेवायला सांगितलें पाहिजे " शारदा पुटपुटली.

तिचे वडील दिवाणखान्यांत गंभीर मुद्रेनें फिरणाऱ्या कारभाऱ्यांच्या कानाला लागले, " सोन्यासारखें लग्न जमवायच्या ठिकाणीं ही पिरपिर कशाला हो ? दिवाळींत होळीचा खुंट ! बाकी दिवाणखाना मोकळा केला आहे ! ते चार दोन रोगी न् तें मूल नेऊन फेंका ना दुसऱ्या खोलींत ! म्हणजे—"

त्यांच्या तोंडावर हात ठेवीत कारभारी म्हणाले, " हां हां असें बोलू नका. त्या रोग्यांना हलवूं नये असा खुद्द सरकारस्वारीचा हुकूम आहे. "

" म्हणजे सरकारस्वारी हे रोगी पाहाणार कीं आमच्या मुली पाहाणार ? "

" पण या कोंपऱ्यांतल्या सर्व रोग्यांना दुसऱ्या खोलींत डांबून ठेवलें तर सरकारस्वारी इकडे फिरकणारच नाहीं. "

" सगळेंच लहरी खातें दिसतें आहे ! हे रोगी म्हणजे काय राजज्योतिषी म्हणून या वेळेला हे इथें पाहिजेतच ? " शारदेचे वडील स्वतःशींच कातावलेल्या स्वरानें म्हणाले.

कोंपऱ्यांत मुलाजवळच्या खाटेवर पडलेला रोगी या दोघांचें भाषण कान देऊन ऐकत होता असें दिसलें.

कुमारिकागण अधीरतेनें राजेसाहेबांची वाट पाहत होता. पण बाहेर जमलेल्या तमासगिरांच्यां गर्दीखेरीज त्यांना कांहींच दिसेना. " राजा करील ती पूर्व दिशा. जगाच्या डोक्यावर सूर्य आला तरी राजेसाहेबांचें अजून उजाडायाचें असेल ! " अशी टीकाहि हळूहळू सुरू झाली.

पुन्हा तें कोंपऱ्यांतलें मूल रडूं लागलें. त्याच्याजवळचा खाटेवरला रोगी त्याला उगी करण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याचें रडणें कांहीं केल्या थांबेना. " अहो कारभारीसाहेब, त्या पोराला अफू तरी आणून घाला थोडी. आम्ही इथें राजेसाहेबांचें दर्शन घेण्याकरतां आलों आहों. या शेंबड्यालेंबड्या पोराचें रडगाणें ऐकण्याकरतां नाहीं ! " अनेकांनीं असह्य त्रास झाल्याच्या स्वरानें सूचना केली. मुलींपैकीं पुष्कळांच्या कपाळाला आंठ्या पडल्या होत्या.

कारभारीसाहेब म्हणाले, " करणार काय ? पुरतें सहा महिन्यांचें देखील मूल नाहीं. बापड्याची आई कालच वारली. सारखा टाहो फोडतें आहे ! "

" आईबरोबर मेलें असतें तर काय जग बुडालें असतें ? " श्रीच्या वडिलांनीं उद्गार काढले.

खाटेवरल्या रोग्याच्या भुंवया या वाक्यानें चढल्या व त्याचा चेहरा रागानें लाल झाला. पण इस्पितळांतल्या भिकारड्या रोग्याच्या रागाची पर्वा कुबेराला विकत घेऊं शकणाऱ्या श्रीच्या वडिलांना थोडीच होती !

मुलाचें रडणें सारखें वाढतच होतें. आपण जावें व त्या मुलाला अंगाखांद्यावर खेळवून उगी करावें असा विचार त्या मुलींपैकीं तिघी चौघींच्या मनांत आला. त्या दोन पावलें पुढें देखील गेल्या. पण, लगेच त्यांपैकीं बहुतेकींचें मन माघार घेऊं लागलें. ' माझा हा शालू त्याच्या लाळेनें घाण होईल; न् तेवढ्यांतच महाराज आले म्हणजे काम झालें. धर्म करतांना कर्म उभें रहायचें ! '

" आईनें साडी कशी चापून चोपून नेसविली आहे; एकदां विसकटली म्हणजे मला नाहीं पुन्हा नीट करतां येणार ! विसकटलेल्या साडीनें मी महाराजांच्या डोळ्यांत थोडीच भरणार आहें ? या पोराचें रडें बंद करायला जावें न् आपण जन्मभर रडत बसावें हा उद्योग कुणी सांगितला आहे ? कुणाचें पोर असेल कुणाला माहीत. नाक वाहात असेल न अंगाला घाण येत असेल ! त्याला उगी करायला गेलें म्हणजे मत्स्यगंधा होऊनच मी परत

यायची. कुणी सांगितल्या आहेत या लष्करच्या भाकरी भाजायला आपणाला ! ”

धर्माचा विचार विजेपेक्षांहि चंचल असतो; त्या दोन तीन मुली टाकल्या पावलींच मागें परतल्या. एकटी वत्सला मात्र थेट कोपऱ्यांत गेली व तिनें तें मूल उचलून घेतलें. ‘ या गेल्या आजीबाई परोपकार करावयाला ’ वगैरे उद्गार तिच्या कानावर पडले; पण तिनें त्यांच्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. खाटेवरला रोगी म्हणाला, “ रडून रडून त्याचा चेहरा सुकून गेला आहे. गालांवरून आंसवांचे ओघळ वाहात आहेत. ” वत्सलेनें त्या बालनारायणाकडे पाहिलें व प्रेमभरानें आपल्या लुगड्याच्या पदरानें त्याचा चेहरा पुसला. दंवबिंदु पडून नंतर सूर्यकिरण पडलेल्या कळीप्रमाणें तें बालमुख दिसूं लागलें. वत्सलेनें त्याची दुधाची वाटी घेतली व त्याला मांडीवर घालून खालील गाणें गुणगुणत ती बोंडल्यानें दूध पाजूं लागली.

नीज कुठें गेली । वनमाळी । कीं कुणि चोरुनि नेली ॥
चोर तुला भेटे । उफराटें । नवल गमे हें मोठें ॥
निजली बघ रजनी । पांघरुनी । शेला अंगावरुनी ॥
निजले नभिं तारे । हो सारे । लावुनि सारीं ‘ दारें ’ ॥

त्या मधुर गाण्यानेंच कीं काय खाटेवरल्या रोग्याचा चेहरा ब्रह्मानंदानें भरून गेला. तो हळूच खाटेवरून उठून जवळच्या दारानें बाहेर गेला.

अर्ध्या घटकेच्या आंत “ राजेसाहेब आले ” असें म्हणत कारभारीसाहेब दरवाजाकडे धांवले व सर्व वधूंचा जीव एकदांचा भांड्यांत पडला. वत्सलाहि त्या मुलाला खांद्यावर टाकून मुलींच्या मेळयांत जाऊन मिसळली. “ राजेसाहेब आज वधूच पाहणार आहेत, दत्तक मुलगा नाहीं बरें ! ” असा तिच्या खांद्यावरल्या त्या बाळजीवाकडे पाहून एकीनें टोमणाहि मारला. राजेसाहेब आंत येतांच मृगारंभीं मेघाकडे पाहणाऱ्या शेतकऱ्याच्या मुद्रेनें सर्वजण त्यांच्याकडे पाहूं लागले. वत्सलेला तो चेहरा आपण कुठेंतरी पाहिल्यासारखा वाटूं लागला. थोडासा विचार करतांच खाटेवरल्या रोग्यासारखाच राजेसाहेबांचा चेहरा आहे असें आढळून आलें. ती आश्चर्यचकित झाली. इतक्यांत राजेसाहेबांनींच बोलावयाला सुरुवात केली. “ सभ्य गृहस्थ

हो, माझ्या विनंतीला आपण मान देऊन इथें आलांत याबद्दल मी आपला फार आभारी आहें. माझी वधूपरीक्षा झाली."

"न पाहतांच परीक्षा ! हें काय गौडबंगाल आहे ?" अशा अर्थाचा प्रश्न सर्वांच्या मुद्रेवर स्पष्टपणें उमटला.

राजेसाहेब पुढें म्हणाले, "हो न पाहतांच वधूपरीक्षा केली असेल असें तुम्हांला वाटत असेल; पण दोन तीन तास डोळ्यांत तेल घालूनच मी माझी जन्माची सोबतीण निवडली. राज्ञीपदाकरितां श्री, शारदा, वेत्रिका, सुभद्रा वगैरे गुणी कुमारिका आज इथें आल्या आहेत हें मला कारभारी-साहेबांकडून कळलें; पण कुटुंब अगर राज्य यांना त्यांच्यापेक्षां निराळ्या मुलीची जोड पाहिजे असें मला वाटत असल्यामुळें पोरक्या पोराला प्रेमानें उचलणाऱ्या या मुलीचीच मी निवड केली आहे. कारभारीसाहेब हिचें नांव काय ?"

"वत्सला."

"कारभारीसाहेब, राजाची सहचारिणी श्री, शारदा अगर वेत्रिका झाली तर प्रजेला सुख लागणें शक्य नाहीं. तिथें वत्सलाच पाहिजे. या इस्पि-तळाच्या युक्तीनें पडलों कीं नाहीं पार या वधूपरीक्षेतून ?"

"खरी शिताफी आहे वत्सलाताईची. आज परीक्षा जिंकली त्यांनींच ! पण पूर्ण ज्ञान असल्याखेरीज परीक्षक तरी परीक्षा कशी घेणार ! मग या परीक्षेचें अर्धें श्रेय महाराजांचें व अर्धें वत्सलाबाईचें असें म्हटलें पाहिजे."

"यापुढें प्रत्येक गोष्टींत असेच वांटे होणार; तेव्हां अर्धांगीच्या या हक्काच्या वांट्याला वधूपरीक्षेपासूनच सुरुवात होऊं द्या."

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें



**प्र. के. अत्रे**

साखरपुडा १॥
ललितवाङ्मय ३॥
दूर्वा आणि फुलें २।

**द. र. कवठेकर**

अपुरा डाव ३
रेशमाच्या गांठी ३

**वा. म. जोशी**

स्मृति–लहरी २
विचार–लहरी २।
विचार–विहार ४।

**पु. य. देशपांडे**

नवें जग ? २॥

**भाई बेके**

रॅायचरित्र १॥

**वि. स. खांडेकर(परिचय लेखक)**

काव्यज्योति १

**आनंदीबाई जयवंत**

पारंब्या २

**लक्ष्मणराव सरदेसाई**

ढासळलेले बुरुज २

**प्रो. वि. ह. कुलकर्णी**

व्यक्तिचित्रें २॥

**ना. ह. आपटे**

फसगत १॥
साजणी ५

**शकुंतला परांजपे**

भिल्लिणींचीं बोरें ३

**कृष्णाबाई मोटे**

मीनाक्षीचें जीवन २।

**र. गो. सरदेसाई**

चलतीं नाणीं १

**रा. श्री. जोग**

सौन्दर्यशोध आणि आनंदबोध ८

**ना. म. पटवर्धन**

हितपत्रें ३
वा. म. जोशी यांचें चरित्र ४।

**वि. वि. बोकील**

बेबीची बहीण ३

**सत्याग्रही**

ग्रह आणि तारे ४॥

**अनंत काणेकर**

धुक्यांतून लाल
तान्याकडे (आ. दुसरी) ३
पिकलीं पानें ( ,, ,, ) १॥

**काकासाहेब कालेलकर**

ब्रह्मदेशचा प्रवास १॥

**य. दि. पेण्ढरकर**

प्रापंचिक पत्रें ३
घायाळ २

**वि. म. भुस्कुटे**

स्टॅलिन ३॥

**कमलाबाई टिळक**

आकाशगंगा २॥

**रामतनय**

साखरगोटी ५

**ह. रा. महाजनी**

आपलें आर्थिक नियोजन ५

